सागर साहित्य : ६

# निशिकांतची नवरी

तीन अंकी नाटक

अनंत काणेकर
बी. ए., एल्एल्. बी.

बा. द. सातोस्कर, बी. ए.
मुंबई. १९३८

सागर साहित्य कार्यालय, त्रिभुवन रोड, मुंबई. ४.

# काणेकरांचें वाङ्मय



१ चांदरात : निवडक कवितांचा संग्रह
२ पिकलीं पानें : लघुनिबंध संग्रह
३ शिंपले आणि मोतीं : ” ”
४ जागत्या छाया : लघुकथा व शब्दचित्रें
५ निशिकांतची नवरी : विनोदी नाटक

अप्रकाशित

६ तुटलेले तारे : लघुनिबंध संग्रह
७ घरकुल : नाटक
८ धुक्यांतून लाल ताऱ्याकडे ! : ? ? ?

मुद्रक:—ब्रम्हानंद मुकुंद नाडकर्णी.
बकुल आर्ट प्रिंटींग प्रेस, आंबेवाडी, मुंबई, ४.

ऑलिव्हर गोल्डस्मिथ

यास

त्याच्या आत्म्याला काय वाटेल

याची मुळींच पर्वा न करतां

सप्रेम समर्पण

# निशिकांतची नवरी

या नाटकाचा पहिला प्रयोग शुक्रवार ता. १९ ऑगस्ट १९३८ रोजीं संध्याकाळीं ४–३० वाजतां 'ड्रॅमॅटिक युनियन' या संस्थेनें मुंबई येथें बॉंबे थिएटरांत करून दाखविला.

पात्रें :

कुंदा ..... Miss Hardcastle
मैना .... MISS NEVILLE
पार्वतीबाई .... Mrs. Hardcastle
निशिकांत .... Young Marlow
नानासाहेब .... Mr Hardcastle
नीळकंठ ..... Hastings
बाळू ..... Tony Lumpkin
दिवाणबहादूर Sir Charles Marlow
भैरवशेट .... Land Lord
सुभान ..... Diggory.
गडी, नोकर, इ.

स्थळ : : सिंधूर—सिंधूर संस्थानची राजधानी

काळ : : संध्याकाळ— ६–३० ते १०–३०

दिग्दर्शक—नंदू खोटे

संगीत नियोजक—गो. रा. मुळे.

संगीत दिग्दर्शक

माधव धुमटकर व गुलाब लाड

## जरूर तेवढें

'निशिकांतची नवरी' हें नाटक गोल्डस्मिथच्या 'She Stoops to Conquer' या विख्यात नाटकाचें स्वैर रूपांतर आहे.

'ड्रॅमॅटिक युनियन' या संस्थेचें ध्येय उत्तम मराठी नाटकें रंगभूमीवर आणणें असें आहे. ज्या मर्यादेंत संस्थेनें काम करावयाचें ठरविलें आहे तिच्यांत नवें तंत्र, वास्तववाद, पुरोगामित्व, मन्वंतर, युगांतर, क्रांतिकारक नाविन्य, वगैरे भानगडींना सध्यां जागा नाहीं तेव्हां बालबोध वळणाचें गोल्डस्मिथचें हें सुंदर नाटक अगदीं बाळबोध वळणानें मी त्यांच्याकरतां तयार केलें आहे. यांत प्रवेश आहेत, पडदे आहेत, पदें आहेत, फार काय स्वगतेंसुद्धां आहेत.

रसिकांना यापेक्षां अधिक सांगणें नलगे.

पारेख स्ट्रीट, मुंबई ४
१३ ऑगस्ट १९३८

अनंत काणेकर.

# जरूर नसतांना

पूर्वप्रसिद्धी न देतांही 'सागर साहित्या' चें नवें पुस्तक म्हणून 'निशिकांतची नवरी' आज प्रकाशित होत आहे. पूर्वीप्रमाणेंच ह्याही पुस्तकाचें रसिक ग्राहकांकडून स्वागत होईल अशी मला आशा आहे.

निशिकांतची ही नवरी महाराष्ट्रीय नसून कुळानें विलायती आहे ही गोष्ट खरी. पण पुष्कळ वेळां विलायती मडमा हिंदी माणसांशीं लग्न करून इकडे आल्या म्हणजे त्या इकडील भाषा, चालीरिती, वातावरण, आचार विचार, यांच्याशीं एवढ्या समरस होतात, कीं ऋषीप्रमाणेंच त्यांच्या मुळाचाही विचार करण्याचें मनुष्य विसरून जातो. अशीच कांहींशी स्थिति ह्या कुलवधूची झाली आहे. गोल्डस्मिथच्या एका चांगल्या नाटकाचें रूपांतर म्हणून नव्हे तर काणेकरांची एक सुंदर कलाकृति म्हणून 'निशिकांतची नवरी' मी वाचकांपुढें ठेवीत आहे.

बकुल आर्ट प्रेस, मुंबई ४
१५ ऑगस्ट १९३८

वा. द. सातोस्कर.

# अंक पहिला

## प्रवेश पहिला

सिंधूर शहरांतील एक जुन्या तऱ्हेचा संस्थानी वाडा.

[नानासाहेब सरंजामे आणि त्यांचें कुटुंब पार्वतीबाई भांडत भांडत प्रवेश करतात]

**पार्वतीबाई :** तुम्ही कांहीं म्हटलंत तरी मी ऐकणार नाहीं. यंदा मुंबईला जायचंच. मेल्या नोकराचाकरांच्या बायकासुद्धां मधून मधून मुंबईला जाऊन येतात. नी आमच्या कपाळीं मात्र बारा महिने तेरा मास हें सिंधूर लिहून ठेवलंय. तें कांहीं नाहीं. शेजारच्या पाटणकरांची मंडळी तर दरवर्षी एकदां तरी मुंबईला जाऊन येतातच.

**नाना :** हो, आणि वर्षभर पुरतील इतके नवे नखरे नी चाळे शिकून येतात! मला नको आहे मुंबईकरांचा चवचालपणा आमच्या सिंधूर संस्थानांत यायला. आम्ही तरुण असतांना आम्हांला कधीं नाहीं वाटलं मुंबईला जावंसं. अलिकडे पहावं तों काय, उठला तो चालला मुंबईला. अरे आहे काय?

**पार्वती :** पुरे झालं तें तुमच्या तरुणपणींचं पुराण. ऐकलंय पुष्कळ वेळां. गेलीं पंचवीस वर्षे तेंच ऐकतेंय. कांहीं नवीन म्हणून करायला

नको. हा मेला वाडा! कोसळून पडेल एकदां अंगावर तेव्हां नवा बांधाल. नांव तरी काय मेलं—मयूराश्रम! कुणाला वाटेल, या गांवांतल्या 'भैरवाश्रमा'सारखी ही सुद्धां एक खाणावळच आहे म्हणून. आणि दिसतो तरी काय खाणावळीपेक्षां चांगला!

**नाना :** काय वाईट आहे ग आपला वाडा? आमच्या पणजोबांनीं तो बांधला; पण आजोबांनीं कुणातरी ज्योतिष्याच्या सांगण्यावरून बाहेरच्या फाटकावर तें मोराचं चित्र बसवलं, नी 'मयूराश्रम' म्हणून नांव दिलं; तेव्हांपासून सारखी चलती सुरू झाली आमच्या घराण्याची.

**पार्वती :** हो, तुमचा तो जुना वाडा, तुमचे ते पणजोबापासूनचे जुने नोकर, तुमच्या पूर्वजांनीं बंडांत केलेले ते जुने पराक्रम, आणि दिवसांतून पन्नास वेळां तुम्ही केलेलीं त्यांचीं वर्णनं!—कंटाळा आलाय मला तुमच्या त्या जुन्या वस्तूंचा!

**नाना :** अग, अशी वैतागतेस काय? हो, मी कबूल करतों; मला सर्व कांहीं जुनं आवडतं. जुन्या गोष्टी, जुनीं पुस्तकं, जुने मित्र, (तिच्याकडे पाहून तिचा हात हातांत घेत) नी जुनी बायकोसुद्धां!

**पार्वती :** (हात काढून घेत) पुरे झाला चावटपणा. शोभत नाहीं आतां या वयांत. आणि काय हो, मी जुनाट दिसतें काय?

**नाना :** छे, छे. तुला कोण जुनी म्हणेल? एकोणीस वर्षांची कोंवळी पोर तूं!

**पार्वती :** पुरे हं चावटपणा. पण तसं कांहीं माझं फार नाहीं वय झालंय. बाळू झाला तेव्हां कुठं अठरा वर्षांची होतें मी. बाळूला नुकतं एकविसावं वर्ष लागतंय.

**नाना :** त्याला एकतिसावं लागलं तरी तो असाच शंख रहाणार! त्याच्या वर्षांची कांहीं मोजदाद करायला नको!

**पार्वती :** काय केलंय हो त्या पोरानं तुमचं? एकुलता एक पोरगा. पण डोळ्यांसमोर नको तुम्हांला तो. शिकत नाहीं म्हणून इतकं कांहीं रागवायला नको त्याच्यावर. शिकून तरी मेलं काय करायचंय त्याला! काय नोकरी करायची आहे, कीं घरांत अन्न नाहीं? खूप आहे नशीबानं त्याच्या. तसा कांहीं बावळट नाहीं तो.

**नाना :** बावळट कशानं? चांगलाच इबलीस आहे कारटा. लहान का घोडा आहे आतां पोरासारख्या खोड्या करायला? परवां ते रावसाहेब बंदुके माझ्याकडे आले होते. त्यांना बर्फ घातलेलं सरबत आणून दे म्हणून सांगितलं. सरबत आणून दिलन्, पण हळूच जातांना बर्फाचा एक तुकडा त्यांच्या पगडीवर ठेवून दिलान्. पांच मिनिटांनीं बर्फ वितळून त्यांच्या हजामत केलेल्या गुळगुळीत डोक्यावर थंड पाण्याचे थेंब पगडींतून ठिबकूं लागले, तेव्हां चमकून म्हाताऱ्यानं पगडी उडवून दिलीन्. काय घाबरला म्हातारा! अगदींच पोर हाताबाहेर गेलाय!

**पार्वती :** पण करायचं तरी काय? लहानपणापासून त्याची प्रकृती ही अशी फाटकी. नाहीं झेपत त्याला शाळेंतला अभ्यास, तर जबर-दस्तीनं का त्याला शिकायला लावायचंय?

**नाना :** शिकायचं राहूं द्या ग. पण त्या भैरवशेटच्या हॉटेलांत गांवांतले सगळे टोळभैरव जमतात, तिकडे जाऊन सदान्कदा पत्ते झोडीत नी विड्या फुंकीत बसतो, तें तरी बंद केलं पाहिजे.

[ पडद्यामागें बाळू ' ए आई ग' म्हणून ओरडतो आहे. ]

**नाना :** हें आलं पहा तुमचं पुत्ररत्न!

[ बाळू प्रवेश करतो. ]

**पार्वती :** काय रे बाळू, कुठं चाललास बाळ? थांब ना. कसली घाई आहे?

**बाळू :** छे, छे. मला नाहीं वेळ आतां मुळींच.

**पार्वती :** संध्याकाळचा थंड वारा सुटलाय. तें गरम पुलोव्हर तरी घालून जा.

**बाळू :** मला नाहीं ग वेळ आतां. मला 'अपॉइंटमेंट' आहे आतां साडेसहा वाजतां.

**नाना :** 'अपॉइंटमेंट' म्हणजे भैरवशेटच्या भैरवाश्रमांत त्या कुशा लॉंड्रीवाल्याशीं नी विष्णू पानवाल्याशींच ना ?

**पार्वती :** कसल्या उडाणटप्पू लोकांत जाऊन बसतोस तूं, बाळू ? मी नाहीं सोडायची तुला. आज घरींच रहा तूं.

**बाळू :** आहे काय घरीं ? सोड हं आई. सांगून ठेवतों.

**पार्वती :** मी नाहीं जाऊं द्यायची आज तुला.

**बाळू :** ( तिला आपल्या बरोबर ओढीत ) तूं खूप ठेवशील धरून मला; पण मी जायचा राहीन बरा.

**पार्वती :** बाळू—बाळू—मलाच ओढीन कुठं नेतोस ?

**नाना :** बाळ्या—कारट्या, कांहीं लाज वाटते का तुला ?

**पार्वती :** जरा पोरपणा केला तर किती खेंकसतां हो त्याच्यावर ?

**बाळू :** बघूं या कुणाला शक्ति जास्त आहे ती !

[ ती 'अरे ! अरे !' करते. तिला ओढीत बाहेर नेतो. ]

**नाना :** आहा ! काय पण आमचे कुलदीपक !

[ कुंदा प्रवेश करते. ]

**नाना :** ही चट्टयाचट्टयांची कुठली साडी ग ? मुंबईची 'लेटेस्ट फॅशन' वाटतं हीं ?

**कुंदा :** नाना, तुमचं आमचं काय ठरलं आहे, विसरलांत वाटतं ? तुमच्याबरोबर बाहेर जातांना तुम्हांला आवडेल अशी साडी मी नेसायची.

मी एकटी बाहेर जाईन तेव्हां वाटेल तसली साडी मी नेसेन. मग तुम्ही कांहीं बोलायचं नाहीं. होय ना? मी आपला करार कसोशीनें पाळनें आहें कीं नाहीं?

**नाना :** वाः, केवढी आज्ञाधारक मुलगी तूं. बरं तें राहूं द्या. पण आज तुझ्या आज्ञाधारकपणाची परीक्षा आहे, कुंदा.

**कुंदा :** परीक्षा ! कसली परीक्षा नाना?

**नाना :** शहाणी मुलगी आहेस तूं. सरळच सांगतों तुला. मुंबईचे माझे स्नेही दिवाणबहादूर रत्नपारखी आहेत ना? त्यांच्या निशिकांतचा नी तुझा जोडा चांगला जमेल, असं वाटतं मला. तुला बघायला त्याला बोलावलं आहे मी आज. कालच त्यांचं पत्र आलं. निशिकांत आतां साडेसातच्या गाडीनं येईल इथं. नी आतांच त्यांची तार आली आहे कीं इकडे कांहीं काम निघाल्यामुळं ते स्वतःही आजच येतायत मागच्या गाडीनं.

**कुंदा :** काय नाना, म्हणतां काय तुम्ही? खरं कीं काय? मला एका शब्दानं तरी अगोदर बोलायचं होतं तुम्ही. शारदेच्या बापा-सारखी मला वाटेल तिकडे ढकलून देतां कीं काय?

**नाना :** तुझा नाना शारदेच्या बापासारखी तुला ढकलून देईल, असं वाटतं का तुला? तुला नाहीं आवडला निशिकांत तर मी कांहीं तुला त्याच्या गळ्यांत बांधणार नाहीं. पण तुला तो आवडेल, कुंदू. तुम्ही एकत्र बोला चाला—माझं कांहीं म्हणणं नाहीं—नी मग तुला तो आव-डला तरच पुढचं ठरवूं.

**कुंदा :** बरेच सुधारक झालांत कीं तुम्ही नाना !

**नाना :** करणार काय? वाढलेल्या मुली गळ्याला लागल्या कीं अलिकडे सगळे आईबाप सुधारक होतात !

**कुंदा :** म्हणजे, मी तुमच्या गळ्याला कां लागलेंय नाना ?

**नाना :** तसं नव्हे ग. मी आपलं सहज बोललों. बाकी निशिकांत तसा मोठा सुशील नी समजूतदार मुलगा आहे.

**कुंदा :** इतकंच ?

**नाना :** आणखी काय पाहिजे तुला? दिसायलाही मोठा गुलजार आहे!

**कुंदा :** इश्श ! नाना !

**नाना :** मात्र कुंदा, उभ्या गांवचा लाजरा आहे म्हणतात तो. मुलींच्या समोर तर डोळा वर करवत नाहीं त्याला.

**कुंदा :** अग बाई ! मग मी बोलूं तरी काय त्यांच्याशीं ?—पण उगाच बायकांसमोर पुढं पुढं करणाऱ्या फाजील पोरांपेक्षां लाजरे पुरुष आवडतात मला.

**नाना :** तुला तो खूप आवडेल. पण तूं त्याला आवडली पाहि-जेस ना !

**कुंदा :** इश्श ! नाना ! बाकी तुम्ही तसं म्हणत असाल, तर तुम-च्याशीं पैज मारून जिंकून दाखवनें निशिकांतांना हवी तर.

**नाना :** पाहूं या. घोडामैदान जवळच आहे आतां. मी जातों आंत. आपण संस्थानी लोक; तो आहे मुंबईचा. आमच्याकडे गबाळे-पणा दिसतां कामा नये त्याला. आपले नोकर म्हणजे एक एक नमुना आहे ! त्यांना जरा तालीम देतों पाहुण्यांसमोर कसं वागायचं त्याची.

[ जातात ]

**कुंदा :** आतां करावं तरी काय बाई ?

– ५१ –

**मन उगाच होइ विकल । सुचत कांहिं नच मना**
**कृतक कोप धरुनि हंसुनि । करिन सहज वंचना**

[ मैना प्रवेश करते. ]

**कुंदा** : मैनाताई, कसं दिसतं ग मला हें नवं पातळ? अगदींच चमत्कारिक दिसतं का?

**मैना** : पातळ कांहीं नाहीं; पण तुझा चेहेरा मात्र चमत्कारिक दिसतोय. काय ग, झालं काय?

**कुंदा** : होणार काय? तुला कळलंच नाहीं वाटतं. नानांच्या धांदरट-पणाची कमाल आहे, बाई. मला पाहयला त्यांनीं आपल्या एका मित्राच्या मुलाला बोलावलंय! तो येणार आहे आत्तां. आणि पांच मिनिटांपूर्वी मला नाना ही हकीगत सांगतात!

**मैना** : नांव काय त्याचं?

**कुंदा** : निशिकांत. मुंबईला नानांचे मित्र आहेत ना दिवाणबहादूर रत्नपारखी? त्यांचा मुलगा.

**मैना** : हात्तिच्या! निशिकांत होय? मग छानच कीं. नीळकंठ-रावांचा जिवश्चकंठश्च मित्र. एकमेकांना सोडून क्षणभरसुद्धां ते दोघे रहायचे नाहींत. नीळकंठरावसुद्धां येतील बहुतेक निशिकांतबरोबर.

**कुंदा** : तुझे नीळकंठराव होय?

**मैना** : माझे? इश्श!—म्हणजे काय ग?

**कुंदा** : पुरे, पुरे. आतां लाजूं नकोस. माहीत आहे मला सगळं.

**मैना** : होय ना? मग बरं तर. मागं आपण मुंबईला गेलों होतों, तेव्हां पाहयलं होतंस ना तूं नीळकंठरावांना? त्यांच्याबरोबर गोरटेलासा एक मुलगा होता ना?—तो निशिकांत.

**कुंदा** : मला नाहीं आठवत. मी नाहीं पाहयलं त्याला.

**मैना** : माणूस मोठा छान आहे. पण स्वभाव जरा तऱ्हेवाईक आहे. गडीनोकरांशीं नी सामान्य माणसांशीं इतक्या मोकळेपणानं

वागेल कीं त्याला कांहीं सुमारच नाहीं. पण आपल्या घराण्याच्या तोलाच्या एखाद्या प्रतिष्ठित गृहस्थासमोर, किंवा बरोबरीच्या सुशिक्षित स्त्रियांसमोर नव्या नवरीसारखा खालीं मान घालून उभा राहील—त्याच्या तोंडांतून शब्द फुटायचा नाहीं !

**कुंदा :** मग मी बोलूं तरी काय त्यांच्याशीं ? खुशाल एकत्र बोला-चाला, नी काय तें ठरवा म्हणून नानांनीं मला अगदीं मोकळं रान दिलं आहे. पण काय ग, तुझं आणि नीळकंठरावांचं सध्यां कुठ-पर्यंत आलं आहे ? आईच्या मनांतून मात्र तूं बाळूशीं लग्न करावं असं आहे. आकाशपाताळ एक करील तुझी ही भानगड तिला कळली तर !

**मैना :** कालच आत्याबाईनीं लग्नाची गोष्ट काढली होती माझ्या-जवळ. मीही आपली 'होय होय' 'होय होय' करीत होतें. मला एव्हां त्यांचं मन दुखवयाचं नाहीं. गोड गोड बोलून मला तेवढा दागिन्यांचा डबा त्यांच्याकडून काढून घ्यायचा आहे. चोरून मी नीळकंठरावांशीं लग्न करणार आहें, हें जर का आत्यांना कळलं तर त्या डब्याची आशाच नको !

**कुंदा :** कसला ग डबा ? मला नाहीं माहीत.

**मैना :** माझ्या आईच्या दागिन्यांचा आहे तो. आईनं मरतांना आत्याबाईजवळ दिला होता तो ठेवायला माझ्यासाठीं. तसं दागिन्यांचं मला कांहीं नाहीं वाटत ग. आणि नीळकंठरावही मला त्यांची गोष्ट काढूं देत नाहींत. त्यांना मीच हवी आहे. पण सध्यां दिवस हे असे आहेत. नीळकंठरावांची नोकरीही कांहीं मोठ्या पगाराची नाहीं. असले पांच सात हजाराचे दागिने जवळ तर उपयोगी पडतील अडीअड-चणीला. नाहीं का ?

**कुंदा** : तें पहा बाई तुझं काय तें ! तूं आणि आई !–आम्हाला नकोत त्या दागिन्यांच्या भानगडी. बाकी नीळकंठरावांशीं तूं लग्न केलंस तर बाळूला मुळींच वाईट वाटायचं नाहीं. तो पेढे वांटील गांवभर. त्याला तूं मुळींच आवडत नाहींस. कां असं कुणाला ठाऊक !

**मैना** : बाळू तसा खरंच अंतर्यामीं चांगला मुलगा आहे. मी लग्न करतें म्हटलं, तर जाऊं दे एकदांची पीडा म्हणून तो मला सगळी मदत करील.

**कुंदा** : अग बाई ! किती वाजले ? आपणाला आतां तयारींत राह्यलं पाहिजे.

[ जातात. ]

---

## प्रवेश दुसरा

भैरवाश्रमाचा व्हरांडा

**भैरवशेट** : काय बाळासाहेब, तुम्ही अजून इथंच ? इतर लोक गेले वाटतं ?

**बाळू** : ( सिगारेट फुंकीत ) गेले लेकाचे. सात वाजले कीं त्यांना लागते घराची ओढ. आपणाला आणखी एक कप गरम गरम चहा पाहिजे बुवा, भैरवशेट.

**भैरवशेट :** चहाला काय तोटा ? हा आलोंच.

[ जातो. चहाचा कप घेऊन परत येतो. ]

**भैरवशेट :** बाहेर कुणी तरी दोन गृहस्थ टांगा उभा करून कुणाची तरी चवकशी करताहेत. शेजारच्या राईतून रस्ता चुकून या बाजूला आलेत असं वाटतं. नानासाहेबांच्या नांवानं चवकशी करताहेत.

**बाळू :** समजलों, समजलों. त्यापैकीं एकजण आमचे भावी मेव्हणे असावेत. मुंबईवाले दिसतात का ?

**भैरव :** हो. त्यांत कांहीं संशयच नाहीं. त्यांचे ते ऐटबाज कोट नी त्या साहेबी टोप्या !

**बाळू :** पाठवून द्या त्यांना इथं. मी करतों त्यांची बरोबर व्यवस्था. [ भैरव जातो. ] नानांची चांगलीच करतों गंमत.

[ निशिकांत आणि नीळकंठ यांना घेऊन भैरव शेट प्रवेश करतो. ]

**निशिकांत :** हें गांव आहे कीं वेड्यांचा बाजार आहे ! स्टेशनांत उतरल्यापासून दोन तास इकडून तिकडे भटकतों आहोंत, आणि सरंजाम्यांचं अजून घर सांपडत नाहीं. एक म्हणतो या बाजूला जा, तर दुसरा म्हणतो मागं वळून पुन्हां डाव्या बाजूला जा. असं करतां करतां स्टेशनाकडेच आपण तीनदां परत आलों !

**नीळकंठ :** त्यांत तुझा आणखी लाजाळूपणा ! कुणी चांगलासा प्रतिष्ठित गृहस्थ दिसला तर तूं त्याला विचारूं देत नाहींस. तूं त्याची नजर चुकवतोस. कसली लाज वाटते तुला कुणाला ठाऊक !

**निशिकांत :** आपणाला विनाकारण कुणाच्या उपकारांचं ओझं नको बुवा. त्यापेक्षां त्रास झालेला पत्करला. आपण विचारायचं आणि एखाद्यानं तिरसटपणानं 'आम्हांला काय विचारतां' म्हणून पुढं जायचं, हें आपणाला सहन होत नाहीं.

**बाळू :** मध्येंच तोंड घालायची माझी इच्छा नाहीं; पण आपण नानासाहेब सरंजाम्यांची चवकशी करीत होतां असं मला कळलं. सध्यां तुम्ही शहराच्या कुठल्या भागांत आलां आहांत याची कांहीं कल्पना आहे का तुम्हाला ?

**नीळकंठ :** मुळींच नाहीं. तुमच्या या सिंधूर शहरांत आम्ही पहिल्यांदाच येतों आहोंत. त्यांत आणखी इथं संस्थानी कारभार. तुम्ही आम्हाला बरोबर पत्ता देऊं शकाल का ?

**बाळू :** हो. न द्यायला काय झालं ? पण आपण आलांत कुठून ?

**निशिकांत :** आम्हाला पत्ता देण्याकरतां तुम्हाला आमच्या पत्त्याची कांहीं जरूर नाहीं !

**बाळू :** तें खरं. पण तुम्हांला मी कांहीं माहिती द्यायचं कबूल केलं आहे. तेव्हां तुमच्याकडे मी उलट कांहीं माहिती मागितली, तर त्यांत कांहीं वावगं आहे, असं मला वाटत नाहीं. बरं, तें असो. हे तुम्हाला पाहिजेत ते नानासाहेब सरंजामे म्हणजे एक जुनाट, सनातनी, चमत्कारिक स्वभावाचे म्हातारे गृहस्थ आहेत तेच ना ? त्यांना एक मुलगी आणि एक हुषार मुलगाही आहे. तेच का ?

**नीळकंठ :** आम्ही कांहीं त्या गृहस्थांना पाहिलेले नाहींत; पण तुम्ही सांगतां त्याप्रमाणं त्यांना एक मुलगा नी मुलगी आहे खरी.

**बाळू :** ती मुलगी म्हणजे एक ध्यान आहे;—किडकिडीत, उंच, गालफडं बसलेली ! मुलगा मात्र झकास आहे,—बांधेसूद, देखणा, गोरापान—

**निशिकांत :** आम्हांला मिळालेल्या माहितीप्रमाणं ती पोरगी अतिशय सुंदर आणि चुणचुणीत आहे म्हणतात. तो पोरगा मात्र एक कुचकामी, आईनं लाडावून ठेवलेलं कारटं आहे म्हणे !

**बाळू :** आं ! अस्सं काय ?——मला नाहीं वाटत तुम्ही नानासाहेब सरंजाम्यांच्या घरीं उद्यां सकाळपर्यंत पोहोंचाल म्हणून. अहो, ते शहर सोडून इथून पंधरा मैलांवर असलेल्या आपल्या खेड्यावर राह्यला गेले आहेत.

**नीळकंठ :** अरे बापरे ! आतां रात्रीचं इथं करायचं काय ?

**बाळू :** पाहिजे तर त्यांच्या खेड्यावर जा. पत्ता देतों मी. टांगा कांहीं जात नाहीं तिथं. तो समोरचा डोंगर ओलांडून चिखल तुडवीत पंधरा मैल जावं लागेल पायीं. ( भैरवशेटकडे पाहून डोळे मिचकावतो.)

**नीळकंठ :** निशी, आतां करायचं काय ?

**निशिकांत :** यांच्या या भैरवाश्रमांतच राहूं या आजची रात्र. उद्यां सकाळीं पाहूं या काय करायचं तें.

**भैरवशेट :** इथं रहाण्याची सोय नाहीं, साहेब. एक खोली देतों आम्ही एखाद्या पाव्हण्याला——

**बाळू :** पण त्या खोलींत आज चौघे उतारू कोंबून भरले आहेत. होय ना, भैरवशेट ?

**निशिकांत :** नशीब आमचं ! आतां जायचं कुठं ?

**बाळू :** एक चांगलं हॉटेल आहे इथं. तिथं होईल कदाचित् तुमची सोय.

**नीळकंठ :** कुठं—कुठं आहे तें ?

**बाळू :** हा समोरचा रस्ता ओलांडून गेलांत म्हणजे उजव्या बाजूला वळा. तिथं कोपऱ्यावरच एक भव्य जुना वाडा दिसेल. फाटकावरच मोराचं चित्र आहे बघा. आणि त्याच्याखालीं अक्षरं कोरलेलीं आहेत 'मयूराश्रम' म्हणून. अगदीं ' फर्स्ट क्लास ' हॉटेल आहे तुम्हा मुंबईच्या लोकांना !

**भैरवशेट** : बाळासाहेब !

**बाळू** : चूप बसा हो, भैरवशेट. तुमच्या कां पोटांत दुखतं ?

**निशिकांत** : सुटलों बुवा एकदांचे.

**बाळू** : पण एक लक्षांत ठेवा. 'मयूराश्रमा'चा मालक जो म्हातारा आहे, तो चिक्कार पैसा मिळवून आतां झाला आहे गबर. त्याला आतां पैशाची पर्वा नाहीं. पण आपणाला सर्वांनीं मोठा प्रतिष्ठित नी संभावित गृहस्थ समजावं, असं त्याला वाटतं. तो तुमची पाठ सोडणार नाहीं. हैराण करील तुम्हाला तो आपल्या मोठेपणाच्या गोष्टी सांगून. आपण सिंधूरच्या सरदार मोरावळ्यांचे नातलग आहोंत म्हणून सुद्धां थाप देईल. आणि आपल्या आजींच्या मामांनीं सत्तावन सालच्या बंडांत काय काय पराक्रम केले त्यांचं पुन्हां पुन्हां वर्णन करून तुमचा जीव खाईल. हो. आपलं अगोदरच सांगून ठेवतों.

**भैरवशेट** : मात्र साहेब, तुम्हाला जेवण फर्मास मिळेल. असं जेवण तुम्हाला मुंबईच्या कुठल्याही हॉटेलांत मिळणार नाहीं. तुम्ही 'नको, नको' म्हटलंत तरी म्हातारा तुम्हाला भरपूर खायला घालील !

**निशिकांत** : मग त्याच्या गोष्टी ऐकायला कांहीं हरकत नाहीं. कुठं म्हणालांत ? हा पलीकडचा रस्ता ओलांडून डाव्या बाजूला जायचं, नाहीं का ?

**बाळू** : नव्हे हो, उजव्या. मीच पुढं होऊन तुम्हाला दाखवतों.

[ भैरवाकडे डोळे मिचकावीत पहात त्यांना घेऊन निघून जातो. ]

**भैरव** : ( दोन्ही हात कोपरापासून जोडून ) कमाल आहे या गृहस्थाची !

## प्रवेश तिसरा

मयूराश्रमाचा बाहेरचा व्हरांडा

[ नानासाहेब नोकरांना तालीम देत आहेत. ]

**नाना** : आतां आलं ना सगळं तुमच्या ध्यानांत ? कालपासून सांगतोंय कुणी कुठं उभं राह्यचं तें. मोठ्या घराण्यांत वावरलेले हुषार पण समजूतदार नोकरचाकर आहेत, असं वाटलं पाहिजे पाव्हण्यांना ! काय आलं ना लक्षांत ?

**पहिला नोकर** : होय, साहेब.

**नाना** : पाहुणे कसे बसतात, कसे उठतात, काय करतात, याकडे टकमका पहात उभं राह्यचं नाहीं. हांक दिल्याबरोबर पुढ्यांत हजर होतां येईल इतक्या जवळ उभं राह्यचं, पण आपण जवळपास घुटमळतों आहोंत असं पाहुण्यांना वाटूं द्यायचं नाहीं. काय ?

**दुसरा नोकर** : होय साहेब.

**नाना** : 'होय साहेब' काय ? ए टोणग्या, असंच डोकं खाजवीत उभा रहाणार का तूं ? नी तुझ्या धोतराला काय झालंय रे ? वर खालीं कशाला करतोस ? हात नीट धरतां येत नाहींत का तुम्हाला ? या सुभानकडे पहा बरं. त्यानं आपली मान मुद्दाम जरा जास्त ताठरून धरल्यासारखी दिसते. पण हरकत नाहीं. एकंदरींत कसा तो रुबाबांत उभा रहातो पहा !

**सुभान** : म्हणजे साहेब, उगाच नाहीं येत रुबाब. महाराजांच्या सैन्यांत नाईक होतों मी कांहीं वर्षं. आज सुभेदार झालों असतों. आमची कवायत एकदां सकाळीं सुरू व्हायची, ती संध्याकाळपर्यंत——

**नाना** : हां, हां, सुभान ! तुझी जीभ आवर जरा. पाहुण्यांसमोर अशी वटवट करून त्यांना सतावतां कामा नये. घरांतलीं माणसं आणि पाहुणे बोलत असतांना नोकरांच्या कानावर त्यांच्या गोष्टी पडल्या तरी आपण ऐकतों आहोंत, असं त्यांना दाखवतां कामा नये. तुला मधें मधें बोलण्याची फार संवय आहे, सुभान. घरच्या माणसांची गोष्ट वेगळी. पण आज पाहुणे येणार आहेत. बरं नाहीं दिसत तें.

**सुभान** : पण, साहेब——

**नाना** : पण बीण कांहीं नाहीं. मी कुणाला एखादी हंसण्यासारखी गोष्ट सांगायला लागलों, कीं त्या पाहुण्यांच्या आधीं तूंच खो खो करून हंसायला लागतोस. तें कांहीं चालायचं नाहीं. आजचे पाहुणे असे तसे नाहींत.

**सुभान** : पण साहेब, तुम्ही कोंकणांत गेलां होतां तेव्हां बोटींतून मचव्यांत पाऊल टाकतांना तुमचा पाय निसटला नी तुम्ही पाण्यांत पडलां, आणि तुमची पगडी पाण्यावर तरंगायला लागली, ती गोष्ट तुम्ही पाहुण्यांना सांगितली तर मात्र आपल्या बाच्याला हंसूं आवरणार नाहीं. गेल्या दहा वर्षांत शंभर वेळां मी ती गोष्ट ऐकली असेल. पण ती पुन्हां ऐकली तर पुन्हां हंसतां हंसतां माझी मुरकुंडी वळेल, साहेब !

**नाना** : ती गोष्ट आहेच तशी छान. तो तर माझ्या ठेवणींतला बार आहे. पाहुणा कशानंच हंसला नाहीं, तर त्या गोष्टीनं हंसलाच पाहिजे. त्या गोष्टीपुरता तूं हंसलास तर कांहीं हरकत नाहीं, सुभान.

बरं, तें असूं द्या. पुन्हां एकदां तालीम करून पाहूं या तुमच्या सगळं ध्यानांत आहे कीं नाहीं तें. समजा, मी पाहुणा आहें. मी आतां आपला कोट काढायला लागतों. मग तुम्ही काय करायचं? ( सुभानखेरीज दोघेही नोकर नानासाहेबांच्या कोटाची दोन्ही बाजूंनीं ओढाताण करूं लागतात. ) अरे, अरे, असं दोघांनींही पाहुण्यावर तुटून पडायचं नाहीं. फक्त एकानं त्यांचा कोट हलकेच मागल्यामागं काढून घ्यायचा. हं. पाहुण्यांनीं म्हटलं 'चहा !' तर? ( दोघेही नोकर 'आलाच साहेब !' म्हणून जीव घेऊन आंत पळत सुटतात. ) यांना काय वेड लागलंय कीं काय ? वाघ मागं लागल्यासारखे आंत पळा म्हणून का मीं शिकवलं यांना ? कांहीं जमेलसं दिसत नाहीं—आंत इतर व्यवस्था तरी काय आहे ती पाहून येतों. तूं बाहेरच रहा, सुभान. पाहुणे यायची वेळ झाली आहे आतां.

[ जातात. ]

[ निशिकांत आणि नीळकंठ आपल्या सामानासह प्रवेश करतात. ]

**सुभान** : यावं महाराज. बसा. साहेबांना आंत जाऊन वर्दी देतों.

[ जातो. ]

**नीळकंठ** : आहे बुवा, मयूराश्रमाचा रुबाब. ठीक दिसतंय हें हॉटेल. वाडा जुना दिसत असला, तरी भव्य नी ऐसपैस आहे.

**निशिकांत** : अरे, तें असं असणार. एखाद्या चांगल्या श्रीमंत घराण्याचा हा वाडा असणार. दोन तीन पिढयांनीं कामधंदा कांहीं न करतां वाडवडिलांची इस्टेट घर बसल्या खाऊन-पिऊन-चैन करून फुंकून टाकलेली असणार. शेवटीं मालकावर पोटासाठीं खाणावळीचा—नाहीं तर हॉटेलचा धंदा करायची अशी ही पाळी आलेली आहे. दुसरं काय ?

**नीळकंठ** : बाकी निशी, घरच्यापेक्षां तुला हॉटेलांत किंवा खाणावळींतच अधिक घरच्यासारखं वाटतं यांत शंका नाहीं !

**निशिकांत** : साहजिकच आहे. लहानपणींच माझी आई वारली. तेव्हां शाळेपासूनच मुळीं बाबांनीं मला बोर्डिंगांत ठेवलं. पुढं कॉलेजांत गेलों तेव्हां हॉस्टेलमध्यें रहात होतों. खरोखरच घरच्यापेक्षां मी बाहेरच जास्त राहलोंय.

**नीळकंठ** : आणि म्हणूनच आईबहिणीशींसुद्धां वागायची संवय नसल्यामुळं बायकांपुढं असा बुजल्यासारखा वागतोस! थरथरतोस काय, कांपतोस काय, बावळटासारखा दाढी खाजवीत उभा रहातोस काय! बेट्या, उद्यां त्या नानासाहेबांच्या कुंदाला भेटलास, कीं तूं करणार तरी काय?

**निशिकांत** : कांहीं करणार नाहीं. 'होय'ला 'होय', नी 'नाहीं'-ला 'नाहीं' म्हणून उत्तर देणार. वर मान करून ती काळी आहे कीं गोरी आहे, हें सुद्धां मी पहाणार नाहीं.

**नीळकंठ** : मग आलास तरी कशाला तूं इतक्या लांब?

**निशिकांत** : तुझ्यासाठीं! आणि बाबांनीं 'जा' म्हटलं म्हणून.

**नीळकंठ** : माझ्यासाठीं?

**निशिकांत** : हो. तुझी ती मैना नानासाहेबांच्याकडे आहे ना? तिला भेटायला तूं इतके दिवस तडफडतोयस्. उघड उघड इथं भेटतां येणार नाहीं. माझ्याबरोबर म्हटलं उजळ माथ्यानं तिला तूं भेटूं शकशील. नाहीं तर मला नको होती ही यातायात. त्या कुंदेच्या चलाखपणाचीं इतकीं वर्णनं मी ऐकलीं आहेत, कीं तिच्यासाठीं मी इथं येण्याऐवजीं ती मुंबईला आली असती, तर मी मुंबईहून दूर कुठं तरी पळालों असतों! नको रे बाबा आपल्याला इतकी हुषार बायको!

**नीळकंठ** : अस्सं! माझ्यासाठीं आलायस् तूं तर एकूण! बाकी कुणाला एखादी पोरगी पळवायची असेल, तर त्यानं तुझी मदत घेणं

म्हणजे कंबक्तीच ! तूं मदत छानच करशील ! आयत्या वेळीं तुझे हातपाय इतके गळतील, कीं त्या पोरींबरोबर तुलाही त्या गृहस्थाला पाठीवर मारून पळवावा लागेल.

**निशिकांत** : आपलं आहे खरं बुवा तसं. पोरींना खूष करण्याची कला तुम्हाला साधते तशी आपल्याला नाहीं साधत. [ नानासाहेब प्रवेश करतात. ] हं. हे मालक आले वाटतं.

**नाना** : माफ करा हं. जरा वेळ लागला मला आंत. आपल्यापैकीं निशिकांत रत्नपारखी कुठले? हो. आम्ही आपले सरळ विचारतों. आमचा आहे जुना खाक्या !

**निशिकांत** : ( नीळकंठला ) बॅगेवरचीं नांवं पाहून गृहस्थानं आमचीं नांवंही पाठ केलीन्, आं ! ( नानासाहेबांना ) छे, छे. तसं कांहीं नाहीं. मी रत्नपारखी. हे नीळकंठराव. ( नीळकंठला ) प्रवासांत कपड्यांची अगदीं वाट लागली आहे बुवा. कपडे आधीं बदलले पाहिजेत.

**नाना** : निशिकांत, हें आपलंच घर आहे असं समजा. इकडे तिकडे पहायची कांहीं जरूर नाही. वाटेल तिकडे कपडे काढून ठेवा.

**निशिकांत** : ( नीळकंठला ) निशिकांत अं ! म्हातारा गळ्यांत पडायला लागला. ( नानासाहेबांना ) तें तुम्ही सांगायला नको. आम्ही अगदीं आमचंच घर समजून वागणार आहोंत. झकास घर आहे तुमचं. आवडलं आपणाला. ( नीळकंठला ) निळू, कांहीं धोतरं बितरं घेतलीं आहेस ना बॅगेंत? कपडे बदलून जेवणापूर्वी गांवांत फेरी मारून येऊं.

**नीळकंठ** : धोतरांत कशाला फिरायचं? फिरायचंच असेल तर तोंड वगैरे धुवून चहा घेऊं या, नी असेच जाऊं या.

**नाना** : अहो धोतरं नेसलांत म्हणून काय झालं ! आमच्या सिंधूरांत सर्व चालतं.

**नीळकंठ** : तसं नव्हे हो. धोतर नेसायची अलिकडे बरेच दिवसांत मला संवय नाहीं. तसं घरांत नेसतों. पण काचा वगैरे व्यवस्थित मारणं—तें कांहीं आपल्याला जमत नाहीं. आणि बाहेर फिरायचं म्हणजे जरा काचा वगैरे व्यवस्थित मारून फिरलं पाहिजे.

**नाना** : तुम्हा अलिकडच्या लोकांना धोतराची इतकी भीति वाटते ! अहो, पूर्वींचे लोक धोतर कसून लढाईवर जायचे. आमच्या आजींच्या मामांनीं कधीं मांडचोळणा घातला नाहीं. धोतराचा काचा मारून ते जे एकदां घोड्यावर मांड ठोकायचे ते चार चार दिवस खालीं उतरायचे नाहींत. सत्तावन सालच्या बंडांत नानासाहेब पेशव्यां-बरोबर ते असतांना आठ आठ दिवस त्यांनीं नुसते घोडयावर काढलेत. एकदां नानासाहेबांना तहान लागली —

**निशिकांत** : अहो महाराज, नानासाहेबांपेक्षांही आम्हाला आतां तहान अधिक लागली आहे. दोन गरम गरम चहाचे कप घेऊन या आधीं.

**नाना** : ( स्वतःशीं ) हाच का याचा लाजाळूपणा ! ( निशिकांतला ) चहा कशाला ?—चांगला कोको ठेवलाय तयार करून तुमच्यासाठीं.

**निशिकांत** : ( एकीकडे ) आं ! काय जुलूम आहे म्हाताऱ्याचा ! ( नानासाहेबांना ) छे, छे. कोको फार महाग पडतो. आम्हाला चहाच पाहिजे.

**नाना** : वः निशिकांत, अहो महाग काय नी स्वस्त काय ? तुमच्यापेक्षां आम्हाला पैशाची का पर्वा वाटते ?

**निशिकांत** : असं का ? मग ठीक आहे. आमचं काय जातंय ! आणा तर कोको.

**नाना** : माझाही कोको घ्यायचा मी ठेवलाय. म्हटलं तुमच्या-बरोबरच घ्यावा एकदम.

**नीळकंठ** : ( निशिकांतला ) म्हातारा चिकटूं लागला! ( नानासाहेबांना ) मग आतां बोलवा कीं कोको!

**नाना** : हो हो तर! अरे सुभान,—ए सुभान! कोको आण बाहेर.

**निशिकांत** : अहो, एवढ्याशा कामाला हवेत कशाला गडीनोकर? तुम्ही जा कीं. जरा इकडून तिकडे चाललांत तर थोडं दोंद उतरेल हें!

**नाना** : ( चमकून स्वतःशीं ) हा मुंबईवाल्यांचा विनय कीं विनोद! जाऊं द्या—तरुण आहे ( उघड ) वः! मोठे विनोदी बुवा तुम्ही मुंबईचे लोक!

[ सुभान कोको आणून ठेवतो आणि जातो. ]

**निशिकांत** : ( नीळकंठला ) अगदीं आपल्यापैकींच एक व्हायला पहातोय म्हातारा! जरा चढवूं या स्वारीला. ( कोको घेत ) वः, अगदीं टेस्टदार आहे बुवा तुमचा कोको! काहो, गेल्या वर्षी इथं साहित्य-संमेलन झालं, तेव्हा पाहुण्यांची चिकार गर्दी झाली असेल तुमच्याकडे?

**नाना** : अशा प्रसंगीं आमच्याकडे गर्दी व्हायचीच. आम्हाला आनंदच आहे त्यांत.

**निशिकांत** : तुम्हाला व्हायचाच आनंद!

**नाना** : आमच्याकडे नाहीं तर कुठं उतरायचं बड्या पाव्हण्यांनीं? अहो, तुमचे ते स्वागताध्यक्ष सरदार मोरावळे म्हणजे आमचे निकटचे आप्त ना!—माझ्या आईचे सख्खे बंधू—माझे मामाच ते.

**नीळकंठ** : ( निशिकांतला ) थापा सुरू झाल्या म्हाताऱ्याच्या! ( नानासाहेबांना ) काहो, खरं म्हटलं तर साहित्यसंमेलनाचे तुम्हीच स्वागताध्यक्ष व्हायचे!

**निशिकांत** : तुमच्यासारख्याच लोकांचं साहित्यसंमेलनांत खरं महत्व !

**नाना** : हो, तसे करीत होते आग्रह मला. पण अलिकडे नाहीं सहन होत मला ही दगदग.

**नीळकंठ** : असं असं !

**निशिकांत** : पण, साहित्याचा तुमचा अभ्यास दांडगा असेल ?

**नाना** : दांडगा म्हणजे तसा कांहीं विशेष नाहीं. तुमच्या त्या अलिकडच्या लघुकथा नी तीं भावगीतं आपणाला आवडतही नाहींत नी समजतही नाहींत. अलिकडे आहे काय वाचण्यासारखं ? आम्ही आपले चिपळूणकरांचे नी आगरकरांचे निबंध वाचीत असूं. अलिकडे तेंही सगळं सोडून दिलंय. गीतारहस्य वाचतों केव्हां केव्हां झोंपण्यापूर्वी.

**नीळकंठ** : ( निशिकांतला ) टिळकांना शेवटीं एक खाणावळवाला वाचक मिळावा ना ! हर हर ! ( नानासाहेबांना ) म्हणजे एकंदरींत तुम्ही कर्मयोगी दिसतां !

**निशिकांत** : हो. रोज निरनिराळ्या प्रकारच्या पाहुण्यांच्या खस्ता काढायच्या म्हणजे काय लहान सहान कर्मयोग आहे !

**नाना** : कर्माचा कर्मयोग !—बाकी तुम्ही म्हणतां तसा पाहुण्यांचा आम्हाला नाहीं त्रास वाटत. आम्हाला नेहमीं पाव्हणे हवेत.

**निशिकांत** : तुम्हाला रोज भरपूर पाहुणे यावेत असं वाटायचंच !

**नाना** : हो. आमच्या घराण्याचा लौकिकच तसा आहे. सरदार मोरावळ्यांच्या बरोबरीनं सिंधूर शहरांत आमचंच घर. फार जुना इतिहास आहे आमचा. सत्तावन सालच्या बंडांत नानासाहेबांच्या फौजेला जेव्हां रसद मिळेनाशी झाली तेव्हां आमच्या आजोंच्या मामांनीं सबंध फौजेला अन्न पुरवायचं आपल्या अंगावर घेतलं—

**निशिकांत** : असं का ?—पण नानासाहेबांच्या फौजेपेक्षांही आम्हांला आतां आमच्या अन्नाची काळजी लागली आहे. आज रात्रीं जेवण काय मिळणार आहे आम्हाला ?

**नाना** : ( स्वतःशीं ) काय गृहस्थ आहे हा ! याला ठरवलं कुणी लाजाळू ! ( उघड ) आम्ही संस्थानी लोक असलों, तरी आमचं जेवण तुम्हा मुंबईकरांसारखंच.

**निशिकांत** : अहो, पण पदार्थ काय काय मिळणार ते सांगाल कीं नाहीं ?

**नाना** : ( स्वतःशीं ) हा मनमोकळेपणा कीं बेशरमपणा ! ( उघड ) अहो, आमची ' ही ' स्वत: बसली आहे सैंपाकीणबाईबरोबर सैंपाक-घरांत. पदार्थांची आज काळजीच नको.

**नीळकंठ** : तुम्हाला काळजी नको. पण आम्हाला आहे ना !

**निशिकांत** : तुमची 'ही' नी तुमची सैंपाकीणबाई खूप ठरवतील काय कराचचं तें ! पण आम्हाला वाटेल तें चालायचं नाहीं. प्रवा-सांत असलों, कीं मला नेहमीचं जेवण चालत नाहीं. मी जाऊं का जरा सैपाकघरांत आम्हांला काय हवं तें सांगायला ?

**नाना** : ( राग गिळून ) छे, छे. तुम्ही कशाला जातां ? या घरांत तुम्हाला काय हवं तें करून मिळेल. तुम्ही नुसता हुकूम करा. (स्वतःशीं) जांवई होणार आहे. थोडं सहन केलं पाहिजे !

**नीळकंठ** : तें बरोबरच आहे. जितकं आम्ही अधिक खाऊं तितकं तुम्हाला बरं !

**नाना** : यांत काय संशय आहे कीं काय ? तुमच्यासाठींच तर सर्व तयारी आहे; मात्र खाण्यापिण्याच्या बाबतींत आम्ही संस्थानी लोक तुम्हा मुंबईकरांना हार जाणार नाहीं. आमचे मामा सिंधूरचे दिवाण

होते तेव्हां महाराजांच्या पंक्तीला बसले असतां, एकदां त्यांनीं एकशेंएक जिलब्या——

**नीळकंठ** : तुमचे मामा या संस्थानचे दिवाण होते अं ?

**नाना** : म्हणजे दिवाणबहादूर सांजगांवकर तुम्हाला माहीतच नाहींत का ?

**निशिकांत** : ते तुमचे सख्खे मामा होय ? ( नीळकंठला ) आतां बहुतेक संस्थानचे महाराज आपले वडील म्हणून हा म्हातारा सांगणार !

**नीळकंठ** : तें राहूं द्या. पण आम्हाला जेवणाला काय मिळणार तें तुम्ही सांगितलंच नाहीं.

**नाना** : अहो म्हटलं ना, 'ती' स्वत: बसली आहे आज सैपाक-घरांत. बासुंदी, पुरी, वांगी-भात, मसाल्याच्या करंज्या——खूप काय काय करताहेत !

**निशिकांत** : अहो, आम्ही काय आमच्या लग्नाचं जेवण जेवायला इथं आलों आहोंत असं तुम्हांला वाटतं कीं काय ?

**नाना** : ( स्वतःशीं ) याच्या जिभेला कांहीं हाड आहे कीं नाहीं ! ( उघड ) एकूण एकच. लग्नाचं काय नी लग्नापूर्वीचं काय ! तुम्ही जेवा तर खरे. मग सगळा पुढला विचार.

**निशिकांत** : तुमचा तो वांगी-भात नी त्या मसाल्याच्या करंज्या आम्हाला कांहीं एक नको. रात्रीं असलं जेवण जेवून काय अजीर्णानं मराचचंय उद्यां ? तुम्हाला काय ?

**नीळकंठ** : आणि मला आहे 'गॅस्ट्रिक ट्रबल्.' त्या मसाल्याच्या करंज्या मला कुणी फुकट दिल्या तरी नकोत !

**नाना** : (स्वतःशीं) यांच्या या चढेलपणाचा मला कांहीं अर्थच कळत नाहीं. (उघड) अहो, असे रागावतां कां ? मी यजमान नी तुम्ही पाहुणे आहांत. तुम्ही सांगाल ते पदार्थ पुन्हां करायला लावतों.

**निशिकांत** : हें पहा. तुमच्या त्या मोठमोठ्या पक्वान्नांच्या याद्या आम्हाला नकोत. आम्हा दोघांनाही अगदीं साधं जेवण पाहिजे. आंबट वरण, भात, एखादी भाजी, चांगलं स्वच्छ तूप नी चपात्या. बस्.

**नाना** : हात्तिच्या ! तुम्ही थट्टा करीत असाल तर करा. पण इतकं तुम्हाला खास मिळेल !

**निशिकांत** : होय ना ? मग आतां गोष्टी पुरे झाल्या. आमच्या खोल्या साफसूफ करून आमचे बिछाने झटकून ठेवायला सांगा.चल पळा.

**नाना** : कांहीं पळायला नको. सुभाननं केव्हांच तुमच्या खोल्या तयार करून ठेवल्यात. तुम्हाला बोटसुद्धां हालवायला नको इथं. सर्व गडी नोकर तुमच्याच तैनातीला आहेत.

**निशिकांत** : Thank you. तें ठीक आहे. पण असल्या ठिकाणच्या गडीनोकरांवर माझा तितकासा विश्वास नाहीं. मी स्वतःच या गोष्टींकडे लक्ष पुरवतों.

**नाना** : पण मी तुम्हाला कांहीं काम करूं देणार नाहीं. तें सर्व माझ्याकडे लागलं.

**निशिकांत** : तुम्ही सर्व लावून घ्याल तुमच्याकडे. पण मी बरा लावूं देईन !

**नाना** : ठीक आहे, चला माझ्याबरोबर आंत. दाखवतों तुमची खोली नी सामान किती लख्ख लावून ठेवलं आहे सुभाननं तें ! (स्वतःशीं) अगदींच लाजाळू !

[ दोघेही जातात. ]

[ मैना प्रवेश करते. ]

**मैना** : अग बाई, तुम्ही इथं!

**नीळकंठ** : त्यांत कसलं आश्चर्य वाटतं तुला? खरं आश्चर्य मला वाटलं पाहिजे तुला या हॉटेलांत पाहून.

**मैना** : हॉटेल!—काय, म्हणतां काय तुम्ही? हॉटेल कसलं? अहो, नानासाहेब नी आत्याबाई इथं रहातात ना? सरंजामे घराण्याचा सिंधूरांतला हा प्रख्यात वाडा. हॉटेल वाटण्यासारखं इथं दिसलं काय तुम्हाला?

**नीळकंठ** : अग, हा 'मयूराश्रम' म्हणजे सिंधूरांतलं एक उत्तम हॉटेल आहे म्हणून एकानं आम्हाला इकडे उतरायला सांगितलं. त्या भैरवाश्रमांत आम्ही नानासाहेबांच्या घराची चवकशी करीत होतों; तिथं बसलेल्या एका उंचेल्या किडकिडीत गृहस्थानं मयूराश्रमांत तुमची 'फर्स्ट-क्लास' सोय होईल म्हणून सांगितलं.

**मैना** : आमचा बाळू असेल तो! असला वात्रटपणा करणारा सिंधूरांत दुसरा कुणी नाहीं!

**नीळकंठ** : बाळू म्हणजे ज्याच्याशीं लग्न कर म्हणून आत्याबाई तुझ्या गळीं पडताहेत तो त्यांचा दिव्य पोरगा का?

**मैना** : तुम्ही त्याच्यावर इतकं चिडायला नको कांहीं. तुम्हाला कांहीं भीति नको. माझा मनापासून तिरस्कार करतो तो. मी त्याला मुळींच आवडत नाहीं. माझ्याशीं लग्न करण्यापेक्षां जीव देईल तो! आत्याबाईना हें सगळं माहीत आहे. तरी त्या सारख्या त्याच्यासाठीं माझ्याकडे रदबदली करतात.

**नीळकंठ** : असं आहे का? मग ठीक आहे. निशिकांतबरोबर त्याची बायको पहायला म्हणून मी आलों आहे. पण माझा खरा उद्देश

आपल्या लग्नाचा एकदां सोक्षमोक्ष लावून टाकायचा आहे. मग काय? उद्यां पहांटेच्याच गाडीनं सर्व मंडळी झोंपली असतांना आपण 'सूं बाल्या' करूंया ना? काय? तुझे कपडे वगैरे बॅगेंत भरून तयार ठेव. उद्यांच्या उद्यां मुंबईत करून टाकूंया वैदिक पद्धतीनं लग्न! पंधरा मिनिटांत लग्न! आपले ते नवमतवादी सिद्धेश्वरशास्त्री आहेतच लग्न लावायला!

**मैना** : तुमचा सगळा बेत मला पसंत आहे. पण आईनं ठेवलेला तेवढा तो दागिन्यांचा डबा मला आत्याबाईकडून काढायचा आहे. युक्तीप्रयुक्तीनं तेवढा तो काढला पाहिजे त्यांच्याकडून.

**नीळकंठ** : जळोत ते दागिने! मला तूं हवी आहेस.

**मैना** : अहो, पण जरा धीर धरा. सगळं कांही व्यवस्थित होण्यासारखं आहे.—हे निशिकांतच येतायत वाटतं?

**नीळकंठ** : हं. एक गोष्ट मात्र लक्षांत ठेव. निशिकांतला त्याची चूक कळतां कामा नये. हें हॉटेल आहे हा त्याचा भ्रम कायम राहूं द्या, बरं का? त्याला जरा का खरी परिस्थिति कळली तर तो लाजून इतका मेल्यासारखा होईल, की आत्तांच्या आत्तां हें घर सोडून मुंबईला चालता होईल! मग मात्र उद्यां सकाळचा बेत फिसकटून जाईल.

**मैना** : त्याची काळजी नको तुम्हाला.—मी त्याला चांगलीच बनवतें.

[ निशिकांत येतो. ]

**निशिकांत** : या म्हाताऱ्याच्या आदरातिथ्याचा अगदीं जुलूम झाला आहे, बुवा! मला श्वास घ्यायला तो एक क्षण मोकळा देत नाहीं. त्याच्या बायकोनं तर कहर केला! आपल्याच बरोबर जेवायला बसायचा त्यानं हट्ट धरला आहे! ( मैनेकडे लक्ष गेल्यावर ) या कोण?

**नीळकंठ** : आपलं नशीब शिकंदर आहे आज, निशी. ही मैना.—ही आणि कुंदा नानासाहेबांबरोबर खेड्यावर गेलीं नव्हती. इथं कुणी तरी त्यांची मैत्रीण उतरली आहे—तिच्याबरोबर रहाणार आहेत या इथं आजचा दिवस. कुंदा आतां येईल बाहेर. चैन आहे तुझी.—इतक्या मोकळ्यापणानं तुझी आणि तिची भेट होऊं शकेल, असं आपल्या स्वप्नांतही नव्हतं.

**निशिकांत** : हें सगळंच स्वप्न झालंय. संध्याकाळपासूनच्या या एक एका भानगडींनीं मी आलें आहे मेटाकुटीला. त्यांत आणखी ही भानगड उपस्थित झाली ! आतां मात्र कडेलोट झाला !

**मैना** : अहो, कडेलोट कसला ? आयती भेट होते आहे—

**निशिकांत** : कपाळाची भेट ! माझी दाढी ही अशी वाढलेली !—कपड्यांची अशीं गोणपाटं झालेलीं प्रवासांत ! मला वाटतं मी तिला उद्यां त्यांच्या घरींच भेटेन. मी जाऊन बसतों माझ्या खोलींत. तुम्ही सांगा तिला ! [ जायला लागतो. ]

**मैना** : अहो, निशिकांत, असं काय करतां ? एखाद्या मुलीचा असा अपमान करणं बरं नाहीं. तुम्ही तिला मुद्दाम टाळलंत, तर तिला काय वाटेल ? तिला आतां कळलंच असणार तुम्ही इथं आहांत तें. तें कांहीं नाहीं—थांबा. आतां येईल ती. तुम्ही भेटलंच पाहिजे तिला.

**निशिकांत** : अहो,—पण—अं—बरं. पण निळू, तूं मला सोडून इथून जाऊं नकोस. तूं इथं माझ्या बाजूलाच उभा रहा. माझी कांहीं चूक झाली तर तूं—

**नीळकंठ** : जीते रहो पठ्ठे !—हिंमत मर्दा तो मदत खुदा !—होऊन जाऊं द्या एकदां चकमक.

**निशिकांत** : तसा मी भीत नाहीं रे. पण ती भलतीच हुषार आहे म्हणे !

[ कुंदा प्रवेश करते. ]

**मैना** : हे निशिकांत. आणि ही आमची कुंदा, बरं का निशिकांत.

**निशिकांत** : ( मान वर केल्याशिवाय ) तसं मी–मी ऐकलं आहे त्यांचं नांव.

**कुंदा** : तुम्हाला प्रवासांत फार त्रास झाला असेल नाहीं ? अलिकडे यात्रा आहे या बाजूला. तेव्हां गाडींत भलतीच गर्दी असते.

**निशिकांत** : नाहीं तशी विशेष,—हो, असते गर्दी. पण तुमचं हें गांव फार–म्हणजे फारच छान आहे !

**नीळकंठ** : ( मागून हळूच ) Buck up. छानच बोलतोयस्—Carry on !

**कुंदा** : आवडलं तुम्हाला आमचं गांव ? तुमच्या मुंबईच्या मानानं आमचं गांव म्हणजे एक भिकारडं खेडं आहे.

**निशिकांत** : मी तसा कांहीं फिरलेलों नाहीं;–पण मला गांव पहाण्याची हौस आहे....केल्यानें देशाटन म्हणतात ना ?

**नीळकंठ** : ( हलक्या आवाजांत ) वहावा, Beautiful—अरे, शिवरामपंत परांजप्यांपेक्षां तुझं वक्तृत्व खुलतंय !

**कुंदा** : तुम्हाला काव्याची आवड दिसते !

**निशिकांत** : काव्य नसेल तर जीवनांत काय आहे ?

**नीळकंठ** : अरे व:! Wonderful !–आतां माझी इथं कांहींच जरूरी नाहीं. आम्ही आंत जातों, निशी.

**निशिकांत** : ए निळू, थांब ना. असं काय करतोस ?

**नीळकंठ** : छे रे, ठीक चाललंय तुमचं ! ( कुंदाकडे वळून ) कुंदाबाई, मैना नी मी आंत जाऊन बसतों. तुमची चालूं द्या मुलाखत. दोघांत आम्ही कशाला उगीच !

**निशिकांत** : तुमचा कांहीं त्रास होत नाहीं आम्हाला. ( नीळकंठला ) नकोरे जाऊंस. करूं काय मी ?

**मैना** : हें पहा निशिकांत, Two is Company, three is crowd !

**कुंदा** : तुम्हाला 'कंपनी' हवी आहे म्हणून आंत जातां असं म्हणा ना सरळ ! आमच्यावर कां ढकलतां जबाबदारी ?

**मैना** : बरं, तसं म्हण. कांहीं हरकत नाहीं.

**नीळकंठ** : बरं आहे. चालूं द्या, निशी !

**निशिकांत** : ए–निळू !

[ नीळकंठ व मैना आंत जातात. ]

**कुंदा** : ( स्तब्धतेंत कांहीं वेळ गेल्यावर ) तुम्हाला जीवनांत काव्याचं महत्व वाटतं तर !

**निशिकांत** : ( गोंधळून ) काय म्हणालों होतों मी ? काव्यांत जीवन नसतं—

**कुंदा** : नव्हे–नव्हे, जीवनांत काव्य—

**निशिकांत** : हो–हो–जीवनांत काव्य–! जाऊं द्या तें–तुम्हाला कंटाळा आला असेल माझ्या या रुक्ष वटवटीचा !

**कुंदा** : वटवट !–बोललांत तरी कितीसं तुम्ही ?–मला बाई काव्याची नी वाङ्मयाची चर्चा करणं फार आवडतं. कांहीं बायका सदान् कदा कपड्यांच्या नी दागिन्यांच्या गोष्टी करतात त्याचा मला अगदीं मनापासून तिटकारा येतो.—खरंच सांगतें.

**निशिकांत** : मला सुद्धां पुरुषांनीं नेहमीं गंभीर चर्चा करावी असं वाटतं. पोरींबरोबर गुलगुल गोष्टी करीत वेळ फुकट घालवणारांचा मला असा संताप—

**कुंदा** : म्हणजे माझ्याबरोबर बोलायचा तुम्हाला कंटाळा आलाय कीं—

**निशिकांत** : ( जीभ चावून ) छे, छे, चुकलों. तसं माझं म्हणणं नाहीं. तुमची गोष्ट वेगळी आहे. हो, तुमच्यासारख्या हुषार, चलाख, तल्लख—

**कुंदा** : इश्श ! किती स्तुति करतां हो माझी ?

**निशिकांत** : चुकलों—म्हणजे माझ्या म्हणण्याचा अर्थ—काय बरं म्हणत होतों मी ? मी म्हणत होतों—

**कुंदा** : तुम्ही म्हणत होतां—इश्श ! मलाही मेलं नाहीं आठवत !

**निशिकांत** : तुम्ही कंटाळलेल्या दिसतां माझ्या बोलण्यामुळं.

**कुंदा** : छे छे. मुळींच नाहीं. किती किती सुंदर बोलतां तुम्ही !

**निशिकांत** : ( लाजून ) आं !—म्हणजे—छे, तसं नव्हे पण मैनाबाई तुमची वाट पहात असतील.

**कुंदा** : छे छे. तिला खूप बोलायचं असेल नीळकंठरावांशीं !

**निशिकांत** : आं !—कुणी निळूनं मला हांक मारली वाटतं—Excuse me. मी जातों हं. [ जवळ जवळ पळत आंत जातो. कुंदा त्याच्या घाबरटपणाला हंसत त्याच्यामागून जाते.]

[बाळू आणि मैना येतात. त्यांच्यामागून पार्वतीबाई आणि नीळकंठ प्रवेश करतात]

**मैना** : बाळासाहेब, तुम्ही अगदीं बोलतसुद्धां नाहीं माझ्याशीं अलिकडे ?

**बाळू** : चुलींत गेला तुझा बाळासाहेब ! तूं मला बाळूच म्हण. माझ्याशीं लग्न कर म्हणून आई तुझ्यामागं लागली आहे; आणि ती

तुझ्यामागं लागली आहे, म्हणून तूं माझ्या मागं लागतेस! काय पीडा आहे लेकाची !

**मैना** : तें लग्नाचं राहूं द्या हो. पण मी तुमची मामेबहीण आहें ना? बहिणीशीं भावानं बोलायला तर कांहीं हरकत नाहीं ना?

**बाळू** : आतेभावानं मामेबहिणीशीं बोलायला फारच हरकत आहे. मी सांगून ठेवतोंय तुला मैना, याद राखून ठेव फार फाजीलपणा करशील तर—

[ बोलत बोलत लांब जातात.]

**पार्वती** : काय नीळकंठराव, कसा जोडा दिसतो बाळू–मैनेचा?

**नीळकंठ** : व: ! फक्कड.

**पार्वती** : दिवसांतून दहा वेळां दोघं भांडतात; पण तें आपलं उगाच वरवर. तसं दोघांचं फार प्रेम आहे.

**नीळकंठ** : खरंच कीं काय ?

**पार्वती** : त्यांचं एकदां लग्न झालं, कीं मग मी सुटलें. मग मी एकदां तुमची मुंबई पहायला येणार ! काहो, मुंबईच्या बायका खरंच का फार नखरे करतात? हे इथं घरांत मुंबईचं नांव काढूं देत नाहींत.

**नीळकंठ** : अहो नखरे कसले ? हें तुम्ही नेसलां आहांत ना, असलीं लुगडीं तिकडे म्हाताऱ्या बायका नेसतात. तुमच्या वयाच्या बायका सुंदर तलम पातळं नेसतात तिथं. याला नखरे म्हणायचं असतील तर म्हणावे बापडे. आम्हाला कांहीं ते नखरे [illegible] माहींत.

**पार्वती** : म्हणजे मी इतकी का तरुण वाटतें तुम्हांला नीळकंठराव? कीं थट्टा करतां माझी ?

**नीळकंठ** : अहो थट्टा कसली ? तुमचं वय असेल चाळीस बेचाळीस वर्षं. तुम्ही तरुण नाहीं तर काय ? अहो, आमच्या मुंबईत

चाळिसाव्या वर्षी मुली लग्न करतात !

**पार्वती** : इश्श, नीळकंठराव ! कांहीं तरीच.

**नीळकंठ** : कांहीं तरीच काय? वराचं वय पंचेचाळीस-पन्नास नी वधूचं वय चाळीस-बेचाळीस हें आमच्या मुंबईंत नेहमींचं आहे. मुलाची मुंजच होते मुळीं बहुधा पस्तीसाव्या वर्षी !

**पार्वती** : बाई, बाई, बाई ! मुंबईंत सारा ब्रह्मघोंटाळा आहे म्हण-तात तें खरं आहे तर !

**नीळकंठ** : तें खरं असो कीं खोटं असो; आम्हाला त्याचं कांहीं वाटत नाहीं.

**पार्वती** : मग निशिकांतचे वडील बरे एव्हांच त्याचं लग्न करा-यला तयार झाले ?

**नीळकंठ** : अहो, कांहीं झालं तरी तेही मूळचे संस्थानांतलेच !

**पार्वती** : तेंही खरंच बाकी. पण हें खरं काहो, कीं मुंबईंतल्या बायका दागिने नाहीं फार वापरीत म्हणे !

**नीळकंठ** : तें किंचित् खरं आहे नी किंचित् खोटं आहे !

**पार्वती** : म्हणजे ?

**नीळकंठ** : म्हणजे असं, कीं खरे दागिने नाहींत त्या फार वापरीत; पण खोटे दागिने थोडेसे वापरतात !

**पार्वती** : पण खरे दागिने नाहींना फार वापरीत ? नाहीं तर ही माझी भाची मैना पहा. मुंबईला केव्हां तरी जायचं आहे म्हणते. आणि म्हणे मुंबईला जातांना आपले सर्व दागिने हवेत अंगावर घालायला !

**नीळकंठ** : मैनाताई तुमची भाची होय ?

**पार्वती** : हो. एकदां बाळू,—मैनेचें लग्न उरकून टाकलं कीं मी सुटलें. कशीं गुलगुल बोलत बसलीं आहेत पहा ! बाळू,—मैना ! इकडे या ना. इतकं काय अगदीं चाललंय दोघांचं ?

**बाळू** : कांहीं चाललेलं नाहीं, नी कांहीं चालणार नाहीं ? आई, ही ब्याद माझ्यामागं कशाला लावून दिली आहेस ?

**पार्वती** : असं काय बाळू, किती थट्टा करतोस लोकांसमोर तिची ? एकदां लग्न झालं मग—

**बाळू** : लग्न ?—मैनेचं माझ्याशीं ? माझ्या फोटोशींसुद्धां तिचं मी लग्न होऊं देणार नाहीं !

**मैना** : बाळासाहेब, तुम्ही माझ्याशीं लग्न केलं नाहीं, तर तुमच्या फोटोला माळ घालून जन्मभर मी कुंवार राहीन.

**पार्वती** : माझी मैना किती चांगली मुलगी आहे, पाह्यलंत नीळकंठराव ? माझा बाळूही चांगला आहे; पण तोंडानं जरा फटकळ !

**बाळू** : आतां हातानं फटकळ व्हायची माझ्यावर लवकरच पाळी येणार आहे !

**पार्वती** : बाळू—बाळू ! काय तोंडाला येईल तें बोलतोस ? या पाहुण्यांसमोर तरी आईची मर्यादा ठेव. तुम्ही तरी कांहीं सांगा याला नीळकंठराव.

**नीळकंठ** : मी सांगतों चार गोष्टी बाळासाहेबांना, आईसाहेब. तुम्ही निश्चिंत असा.

**पार्वती** : बरं तर मी जातें आंत. चल ग मैने—

[पार्वतीबाई आणि मैना जातात.]

**बाळू** : बायकांची जात म्हणजे एक और चीज आहे, बुवा !

**नीळकंठ** : तुमचा बायकांवर भारी राग दिसतो, बाळासाहेब ?

**बाळू** : अहो राग नाहीं तर काय ? एकापेक्षां एक बेअकली !

**नीळकंठ** : पण तुमच्या आईनं तुमच्यासाठीं पाहून ठेवलेली मुलगी फक्कड आहे. मैनाबाई जितक्या देखण्या तितक्याच समजूतदार दिसतात.

**बाळू** : माझ्याइतकी तुम्हाला तिची माहिती नाहीं म्हणून तुम्ही असं म्हणतां ! अहो, अशी दुष्ट, भांडखोर कारटी आहे ! आणि दिसते तरी काय चिचुंद्रीसारखी !

**नीळकंठ** : मला नाहीं तसं वाटत. मोठ्या शांत नी विचारी दिसतात त्या.

**बाळू** : अहो, चारचौघांत असली म्हणजे मोठी गरीब गोगल गाईचा आव आणते ती. घरांत पहा. पिसाळलेली मांजरी पत्करली ! आईनं माझ्यामागं ही ब्रह्महत्या लावली आहे !

**नीळकंठ** : मग हिला इथून पळवून नेऊन तुमची सोडवणूक करायचं एखाद्या मित्रानं ठरवलं तर ?

**बाळू** : इतका जीवावर उदार झालेला मित्र आहे कुठं बाबा ?

**नीळकंठ** : मी करतों तुमचं काम. मात्र तुमची मदत पाहिजे मला.

**बाळू** : हें काम करीत असाल तर माझे पंचप्राण ओवाळून टाकतों हवे तर तुमच्यावरून ! तिचा जीव तिच्या त्या दागिन्यांसाठीं मागं घुटमळत असले, तर आईच्या पेटींतला तिचा तो दागिन्यांचा डबा हरप्रयत्नांनीं काढून देतों हवा तर !

**नीळकंठ** : भले बहाद्दर, बाळासाहेब. तुमच्यासारखा माणूस नाहीं जगांत !

**बाळू** : चला 'शुभस्य शीघ्रम्.' आत्तां सुरवात करतों तुमच्या कामाला.

[दोघेही जातात.]

पडदा.

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

नानासाहेबांचा वाडा.

[ नानासाहेब बसले आहेत. कुंदा प्रवेश करते. ]

**नाना** : काय ग कुंदा, तें चट्टयापट्टयांचं पातळ बदलून हें जाडं-भरडं लुगडं कां बुवा नेसलीस?

**कुंदा** : तुम्हाला आवडत नाहीं ना तें? म्हटलं तुम्हाला आवडतं तसलं जाडंभरडं जुन्या तऱ्हेचं लुगडं नेसावं.

**नाना** : बाकी आतां मला नाहीं वाटत सर्वच बाबतींत तूं माझं ऐकावंस असं!

**कुंदा** : कांहो नाना!

**नाना** : दिवाणबहादुरांच्या निशिकांतची मी तोंड भरून तुझ्या-पुढं शिफारस केली; आणि त्याच्याशीं लग्न कर म्हणून तुला मोठ्या आग्रहानं सांगितलं खरं; पण आतां पस्तावा होण्याची वेळ आली आहे.

**कुंदा** : म्हणजे? कशानं नाना?

**नाना** : मोठा विनयशील नी गरीब मुलगा आहे म्हणून जो तो सांगत होता, आणि पाहतों तो काय बेफामच प्रकार आहे !

**कुंदा** : म्हणजे केलं तरी काय त्यांनीं नाना ?

**नाना** : केलं काय ?—आपले जोडे पुसायला नी पाय चेपायला सांगायचं तेवढं त्यानं बाकी ठेवलंय !

**कुंदा** : तुमचा कांहीं तरी गैरसमज झालेला दिसतोय, नाना. मघां माझ्याशीं किती अदबीनं वागत होते ते. बोलतांना लाजतात तरी किती ! वर मान करून त्यांच्यानं पहावत नाहीं—एक एक शब्द तोंडांतून फुटतांना मारामार.--घाबरलेला ससासुद्धां अधिक धीटपणानं वागेल !

**नाना** : कुणाच्या तोंडांतून शब्द फुटत नाहीं ?—कोण मान वर करून पहात नाहीं ? घाबरलेला ससा ! खरंच, घाबरलेला ससा कीं पिसाळलेला कुत्रा !

**कुंदा** : नाना, तुम्ही दुसऱ्या कुणाला तर भेटलां नाहींत ? ते किती विनयशील आहेत म्हणून सांगूं !

**नाना** : हो, विनयशील तर ! आज जेवण काय केलंय म्हणून दरडावून मला विचारतो !—किती विनयशील !

**कुंदा** : आश्चर्य आहे. मला दर वाक्यागणिक तुम्हाला कंटाळा तर नाहीं ना आला म्हणून मोठया अदबीनं विचारीत होते. शेवटीं कांहीं तरी निमित्त काढून नीळकंठराव मला बोलवताहेत असं म्हणून माझ्या पुढ्यांतून त्यांनीं पळ काढला !

**नाना** : मला मात्र लेकाचा आपल्या बापाचा पगारी नोकर समजतो ! 'कोको आण' म्हणून सुभानला मी हांक मारली, तर एव-

ढ्याशा कामाला नोकर कशाला हवा—तुम्हाला जायला काय झालं ? म्हणून मला खडसावतो !

**कुंदा** : निशिकांत असं म्हणतील, हें मला शक्यच वाटत नाहीं. आपणा दोघांपैकीं एकाची कांहीं तरी चूक होत आहे.

**नाना** : कुणाचीही चूक असो—मला नाहीं वाटत त्याचं तुझ्याशीं लग्न व्हावं असं !

**कुंदा** : तुम्ही म्हणतां तसे ते असतील, तर मी तरी कसं लग्न करीन नाना त्यांच्याशीं ?

**नाना** : मी म्हणतों तसाच तो आहे !

**कुंदा** : चुकतां नाना, तुम्ही. मी म्हणतें तसे आहेत ते !

**नाना** : तुम्हा पोरींना एखादा गोरागोमटा, झकपक कपडे केलेला पोरगा दिसला, कीं मग दुसरं तुम्ही कांहीं पहात नाहीं !

**कुंदा** : नाना, पण माझ्यावर तुमचा विश्वास आहे ना ?

**नाना** : विश्वास आहे ग. पण हा भलताच बेफाम माणूस आहे !

**कुंदा** : माझ्या मतें ते मुळींच बेफाम नाहींत. थोडे बेफाम असते तर बरं झालं असतं असं मला वाटतं ! पुरुषांनीं इतकं लाजाळूपणानं वागलेलं मला नाहीं आवडत बाई !

**नाना** : ठीक आहे. कांहीं चमत्कार होऊन तुझ्याशीं बेफामपणानं आणि माझ्याशीं लाजाळूपणानं तो वागूं लागला तर मीच लग्न लावून देईन त्याच्याशीं तुझं.

**कुंदा** : मात्र माझ्याशीं जर का ते बेफामपणं वागूं लागले, तर तो बेफामपणा, फाजीलपणा वाटून राग नाहींना यायचा तुम्हाला ?

**नाना** : माझ्याशीं अदबीनं वागणार असेल, तर तुझ्याशीं कितीही बेफामपणा त्यानं केला, तरी माझी कांहीं हरकत नाहीं त्याला !

**कुंदा** : पण त्यांच्या स्वभावांत ही उलटापालट करायची कशी ?

**नाना** : तें तुझं तूंच पहा ! मी दिवाण बहादुरांची वाट पहातोंय या सर्व प्रकारांचा निकाल लावायला एकदां !

[ दोघेही जातात. ]

[ दुसऱ्या बाजूनें बाळू आणि नीळकंठ प्रवेश करतात. ]

**बाळू** : हा घ्या तुमच्या मैनेच्या दागिन्यांचा डबा !

**नीळकंठ** : बाळासाहेब ! इतक्या लवकर कसं केलंत हें काम, बुवा ?

**बाळू** : हत्यात कशाला तुम्हाला त्या पंचायती ? डबा मिळाला ना ? झालं तर.

**नीळकंठ** : पण एक घोंटाळा झाला आहे ना ?

**बाळू** : कसला ?

**नीळकंठ** : याच क्षणाला गोड गोड बोलून मैना आईसाहेबांकडून डबा काढायचा प्रयत्न करते आहे. त्यांनीं तो द्यायचा ठरवलं आणि पेटी उघडली तर ? पेटींतला डबा गेलेला पाहून त्या आरडाओरड करतील ना ?

**बाळू** : त्याची काळजी तुम्हाला नको ! डबा द्यायचा विचार आईच्या मनांत कालत्रयींही येणार नाहीं ! ती पेटीजवळ एव्हां जाणार नाहीं; नी तिला कांहीं समजणार नाहीं.

**नीळकंठ** : पण त्यांना जेव्हां समजेल तेव्हां त्या भयंकर रागावतील. काय वाटेल त्यांना ? मला नाहीं बरं वाटत असं करणं.

**बाळू** : अहो शिष्ट, तुमचं तत्त्वज्ञान राहूं द्या आतां. ती पहा. आईच येते आहे. डबा घेऊन आंत चालते व्हा बघूं.

[नीळकंठ घाईनें आंत जातो.]

[ मैना आणि पार्वतीबाई प्रवेश करतात.]

**पार्वती** : अग पण मैने, आत्तांच काय घाई आहे तुझ्या दागिन्यांची? आपल्याकडे मुंबईचे पाहुणे आले आहेत. दिवाणबहादूर येतील आतां कांहीं वेळानं. सर्वांची एकच धांदल उडाली आहे पाहुण्यांची व्यवस्था करतांना—त्यांत तुझी आणखी काय ही धांदल?

**मैना** : पाहुणे आलेत म्हणून तर मी माझे दागिने मागत आहें, आत्याबाई. पाहुण्यांच्या समोर असंच का उघडं उघडं फिरायचं? आज तरी जरा चांगले कपडे करून चार दागिने घालायला नकोत का अंगावर?

**पार्वती** : अग, कुंदाला पहायला आलेत ते. तुला नाहीं!

**मैना** : पण म्हणून काय मला त्यांनीं घरांतली मोलकरीण समजावं कीं काय?

**पार्वती** : तसं नव्हे ग. मी नाहीं कुठं म्हणतें तुला! पण मेला तो तुझा डबा कुठं ठेवलाय तेंच मला आठवत नाहीं.

**बाळू** : हरवलासुद्धां असेल एखादेवेळीं तो, आई!

**पार्वती** : हरवतो कशानं?

**बाळू** : अग पण, म्हणायला काय हरकत आहे?

**मैना** : खरंच हरवलांत कीं काय, आत्याबाई?

**पार्वती** : छे ग, त्याचं काय ऐकतेस! आतां तो शोधायला वेळ नाहीं ग.

**बाळू** : मी शपथेवर सांगतों आई, तो हरवलाच असला पाहिजे.

**पार्वती** : चल,—कांहीं तरी बोलूं नकोस! तुला हवेच असतील तर माझे दोन दागिने देतें. मग तर झालं! ही आलेंच.

[ जाते. ]

**मैना** : हात टेंकले आत्याबाईपुढं ! त्यांचे दोन दागिने घेऊन मी काय करूं ?

**बाळू** : देतेय ते गुपचूप घेऊन टाक. तुझं काय जातंय ? तुझा डबा तिच्या पेटींतून मी केव्हांच उठवलाय, नी देऊन टाकलाय नीळकंठरावांकडे !—अरे बापरे ! आईच ओरडली वाटतं ? त्याच पेटींतले आपले दागिने काढायला गेली कीं काय ? होय, तसंच दिसतंय—जा पळ आंत. मी आईला पाहून घेतों.

[ मैना आंत पळते. ]

[ पार्वतीबाई प्रवेश करते. ]

**पार्वती** : घात झाला !—बाळू, असा बघतोस काय ? माझ्या पेटींतला दागिन्यांचा डबा नाहींसा झाला !

**बाळू** : हरवला असेल, आई ! तुला आठवत नव्हता ना कुठं ठेवलास तो ? दुसरीकडे असेल कुठं तरी !

**पार्वती** : नाहीं रे, मला पक्की आठवण आहे मी त्याच पेटींत ठेवला म्हणून. रोज बघतें मी पेटी उघडून तो.

**बाळू** : मग मघांशी काय म्हणालीस ?

**पार्वती** : तें मघासचं सोड रे ! माझी पेटी कुणी तरी चोरानं फोडली खास ! फोडली—म्हणजे दुसरी चावी लावून माझी पेटी कुणीतरी उघडली !

**बाळू** : दुसरी चावी कुठून आणणार चोर आई ?

**पार्वती** : कांहींच झालं नाहीं, असं काय बोलतोस रे तूं ? कांहीं वाटतं कीं नाहीं तुला !

**बाळू** : अग मला काय वाटणार ? मैनेच्या दागिन्यांचा डबा !—त्याचं तुला नी मला दुःख हवं कशाला ? असला काय नी गेला काय ?

**पार्वती** : गाढवा, एवढा एरंड वाढलास,—कांहीं अक्कल आहे का तुला ? तिचे दागिने गेले म्हणजे तुझेच नाहीं का गेले ?

**बाळू** : आपल्याला नाहीं बुवा तसं वाटत !

**पार्वती** : अरे, असा बघत उभा काय राह्यलायस्. आंत चल. त्यांना सांगून पोलीसांना तरी वर्दी दिली पाहिजे.

**बाळू** : चल आंत. आपलं काय !

[दोघें आंत जातात.]

[कुंदा आणि मैना जिना उतरून दिवाणखान्यांत येतात.]

**कुंदा** : कमाल झाली बाई ! म्हणजे आमच्या 'मयूराश्रमा'ला ते हॉटेल समजतायत होय ?

**मैना** : अग ते तरी काय करणार ? बाळूनंच त्यांना तसं सांगून इथं पाठवलं. आणि नाना म्हणजे एक चमत्कारिक खाणावळवाला आहे म्हणून त्यांचं मारे लांबलचक वर्णन केलं !

**कुंदा** : असं होय ? मग नानांना ते वाटेल तसे हुकूम सोडतायत यांत नवल नाहीं !

**मैना** : आणि मघांशी तूं तिकडून गेलीस ना ? तेव्हां खाणावळवाल्यानं आपल्या मुलीलाही कामाला लावलंय वाटतं म्हणून निशिकांत मला विचारीत होते ! मीही जरा गंमत करायचं ठरवलं. मी म्हटलं, 'अहो ती मुलगी नाहीं—खाणावळवाल्याची भाची !'

**कुंदा** : अग पण, त्यांनीं मला ओळखलं कसं नाहीं ? चांगलीं पांच सहा मिनिटं काव्याविषयीं नी जीवनाविषयीं माझ्याशीं बोलत होते.

**मैना** : पांच सहा मिनिटं बोलत होते, पण एकदां तरी मान वर करून त्यांनीं तुझ्या चेहऱ्याकडे पाह्यलं का ?—आणि त्यांचं मन होतं

कां ठिकाणावर ?–त्यांत आणखी मघाशीं तूं चट्टयापट्टयांचं गोल पातळ नेसली होतीस.

**कुंदा** : हो, तें खरं. मी तें मुद्दाम बदललं आतां. नानांना तरी म्हटलं खूष करावं. त्यांना मुंबईचा नखरा आवडत नाहीं ना ?–तेव्हां अगदीं जुन्या तऱ्हेचं हें लुगडं नेसून म्हटलं पाहुण्यांसमोर वावरावं–नानांना एकदां बरं वाटूं द्या.

**मैना** : तें छान केलंस.––आणि आतां तर आपण खूपच मजा उडवूं.–तुला ते इथं काम करणारी खाणावळवाल्याची भाची समजताय्‌त, तेव्हां तूं तसंच सोंग केलंस तर तुझ्याशीं ते वाटेल तितक्या मोकळेपणानं वागतील. नीळकंठराव म्हणत होते, एकदां तो रंगांत आला कीं भलताच बेफाम माणूस आहे !

**कुंदा** : पण माझा आवाज ओळखतील एखादे वेळीं !

**मैना** : कांहीं ओळखायचे नाहींत ते !–तुझ्याशीं बोलतांना ते इतके 'नर्व्हस' झाले होते––कांहीं लक्षांत येणार नाहीं त्यांच्या! मात्र सोंग असं वठलं पाहिजे !

**कुंदा** : त्याची काळजी नको तुला ! चांगलीच बनवतें त्यांना !

**मैना** : ते बघ आलेच निशिकांत.–जातें मी–हं !

[मैना जाते.]

[ निशिकांत प्रवेश करतो. ]

**निशिकांत** : हें हॉटेल आहे, कीं बाजार आहे ! काय गडबड चालली आहे मघांपासून. एक क्षणभर निवांत बसायला कुठं मिळत नाहीं. ही कोण ?

**कुंदा** : काय, साहेब ?

**निशिकांत** : कांहीं नाहीं साहेब ! तूं कोण ?

**कुंदा** : मी प्रभा. मालकांची भाची. नव्या पाहुण्यांना काय हवं नको तें तूं स्वत: पहा म्हणून मला मामांनीं सांगितलंय.

**निशिकांत** : म्हणजे तुमचं संस्थान या बाबतींत आमच्या मुंबईच्या पुढं गेलेलं दिसतं ! आमच्याकडे कितीही चांगलं हॉटेल असलं तरी पाहुण्यांच्या खास तैनातीला बायका नाहींत तिथं ! सगळा कारभार सडेसोट पुरुषच करतात. बाकी इथं दुसरं कांहीं नाहीं तरी एवढं तरी सुख आहे म्हणायचं ! तुझं नांव काय म्हटलंस ' प्रभा '? वः ! छान आहे नांव ! बाकी तुझ्यासारख्या नाजुक मुलीला इथं खाणावळींत काम करावं लागतं, हें जरा वाईटच !

**कुंदा** : करणार काय ? मामांना हें हॉटेल काढायची कांहीं जरूर नव्हती, हवा तितका वाडवडिलांचा पैसा होता. तो सगळा गेला. एवढा हा वाडा राह्यलाय. नशीबाला आलंय तें भोगलं पाह्यजे !

**निशिकांत** : हा वाडा पाहूनच वाटलं मला अशी कांहीं तरी परिस्थिति असणार म्हणून ! वयाच्या मानानं मात्र खूपच शहाणी दिसतेस तूं !

**कुंदा** : म्हणजे मी चांगली इंग्रजी पांच यत्ता शिकलेंय कीं ! नानासाहेब सरंजाम्यांच्या कुंदाच्याच वर्गांत होतें मी.

**निशिकांत** : खरं कीं काय ? मग तिला ओळखतेस तर तूं ?

**कुंदा** : माझी चांगलीच मैत्रीण होती ती. पण आतां आम्ही झालों गरीब. आतां कशाला ओळख देते ती !

**निशिकांत** : इतकी घमेंडखोर आहे का ती ?

**कुंदा** : तुम्हाला बरीच माहिती दिसते तिची ?

**निशिकांत** : माहिती म्हणजे ?—तिलाच पहायला तर आलोंय मी. तिच्याशीं मी लग्न करावं असं आमच्या वडिलांचं मत आहे !

**कुंदा** : म्हणजे–तुम्हाला नको आहे वाटतं ती ?

**निशिकांत** : नको म्हणजे काय ?–भलतीच हुषार नी चलाख आहे ती म्हणतात. आपलं नाहीं जमायचं अशा बायकोशीं.–आपल्याला एखादी साधारण शिकलेली, खेडवळ, खाणावळवाल्याची भाचीसुद्धां चालेल—पण हें डोईजड लचांड नको !

**कुंदा** : इश्श !–कांहीं तरीच बोलतां ! मघांशीं कुंदाशीं बोलतांना पाह्यलं मी तुम्हाला ! लाजलां होतां काय–नी कांपत होतां काय, नी अडखळत होतां काय ?

**निशिकांत** : हट्–कोण कांपत होता ? मी तिला चांगलींच सण-सणीत उत्तरं देत होतों !

**कुंदा** : कांहीं तरी बोलूं नका !–तिच्याकडे वर मान करून तरी पाह्यलंत कां एकदां ?

**निशिकांत** : ( हंसून ) आः ! चांगलीच पाहिली तिला ! काय पण ध्यान आहे ! नाकावरून नागपूर मेल गेलेली–मला वाटतं तिचा डोळासुद्धां एक तिरळा आहे ! तुला काय वाटतं मी तिला भितों म्हणून ?

**कुंदा** : तुम्ही कशाला भ्याल तिला !–पण तुमचं वर्णन अगदीं चुकीचं आहे. तुम्ही तिला नीट पाहिलीतच नाहीं.–माझ्यापेक्षां ती शतपटीनीं सुंदर आहे !

**निशिकांत** : हें मात्र आपणाला मुळींच कबूल नाहीं. मी तिला नीट पाहिली नसेल. पण तुझ्यापेक्षां सुंदर ?–हट्–शक्यच नाहीं—कपडे फॅशनेबल करते; पण तुझ्यासारखं एक साधं लुगडं नेसवलं तर तुझी मोलकरीण शोभणार नाहीं ती !

**कुंदा** : मी कुठं, नी ती कुठं ?—माझ्यापेक्षां ती किती तरी गोरी नी उंच आहे.

**निशिकांत** : उंच ? छट् !—मघांशीं माझ्याजवळ उभी होती तेव्हां पाह्यलं मी.—जेमतेम माझ्या खांद्याला खांदा लागत असेल. तूंच तिच्या-पेक्षां उंच असशील. पाहूंच या. ( तिला जवळ घेऊन आपल्या खांद्याला तिचं डोकं लावायचा प्रयत्न करतो. )

**कुंदा** : अहो, अहो,—काय करतां काय तुम्ही? पाहील ना कुणी ?

**निशिकांत** : मग पाह्यलं तर काय ?—कुणाच्या बापाची भीति आहे काय ? [ पुन्हां तिला धरून जवळ उभी करण्याचा प्रयत्न करतो. ती धडपडते. नानासाहेब प्रवेश करतात. ]

**निशिकांत** : हा गोष्टीवेल्हाळ आला ! पळतोंच मी आंत. कान फुटले माझे त्याच्या गोष्टी ऐकतां ऐकतां.

[ जातो. ]

**नाना** : ( आश्चर्यचकित होऊन ) अरे रामा ! रामा ! ! रामा ! ! ! म्हणजे या गृहस्थाची इतक्यापर्यंत मजल आली का ? आतां मात्र शर्थ झाली ! दिवाणबहादूर यायचे नसते, तर आतां मात्र गचांडी धरून बाहेर काढला असता !

**कुंदा** : तसं त्यांनीं कांहीं केलं नाहीं, नाना. माझ्या उंचीबद्दल त्यांच्याबरोबर मी वाद घालायला लागलें, तेव्हां मला जवळ उभं रहायला सांगून माझी उंची पहात होते ते !

**नाना** : उंचीच पहात होता हें नशीब ! बेशरम लेकाचा !—हा जर मुंबईच्या एका सभ्य घराण्यांतला मुलगा, तर मुंबईतले इतर लोक आहेत तरी कसे ? दिवाणबहादुरांसाठीं मी तोंड दाबून हा बुक्क्यांचा मार सहन करतोंय !

**कुंदा** : नाना, तुमचा अगदीं गैरसमज झालाय. खरंच ते अतिशय नम्र नी लाजाळू आहेत. माझी अगदीं खात्री झाली आहे.

**नाना** : तुझी झाली असेल, पण माझी होत नाहीं ना !

**कुंदा** : तुमची खात्री करून देण्याचं काम माझ्याकडे लागलं, नाना. तुम्ही मला थोडा वेळ द्या.

**नाना** : दिवाणबहादूर येईपर्यंत तुम्हा सगळ्यांना वेळ दिलाच आहे मी.

[जातात.]

---

## प्रवेश दुसरा

वाड्याचा एक भाग.

मैना आणि नीळकंठ.

**नीळकंठ** : काय, म्हणतेस काय? दिवाणबहादूर आतां इथं येणार आहेत ?

**मैना** : मी स्वत: त्यांची नानांना आलेली तार पाहिली. इथं त्यांचं कांहीं जरूरीचं काम निघालं तेव्हां तुमच्या मागच्याच गाडीनं ते निघालेत.

**नीळकंठ** : ही एक आफतच झाली. आतां काय करायचं ? ते आले, कीं मी कोण हें इथल्या सर्व माणसांना कळणारच. मग आप-

णाला आतां दहांच्याच गाडीनं इथून पसार झालं पाहिजे. तुझी तयारी आहे ना?

**मैना** : तयारी कसली करायची? पण बाळूनं तुमच्याजवळ दिलेला माझा दागिन्यांचा डबा तुम्ही जपून ठेवलाय ना?

**नीळकंठ** : त्याची काळजी नको ग तुला.—आमच्या बॅगांच्या किल्ल्या सर्व निशिकांतजवळ आहेत. त्याच्याचजवळ माझ्या बॅगेंत नीट जपून ठेव म्हणून मघांशींच दिला मी तो. दिवाणबहादूर यायच्या आंत आपणाला पळालंच पाहिजे. नानासाहेबांच्या घरच्या टांग्यांतून स्टेशनकडे गुपचूप आपणाला न्यायची सर्व व्यवस्था बाळूनं करतों म्हणून सांगितलंय.

**मैना** : हो का? मग ठीक. टांगा हांकण्यांत बाळूचा हातखंडा आहे. कुणाला कुठं घाईनं जायचं असलं कीं टांगा हांकायला बाळूच बसतो.

**नीळकंठ** : बोलूं नकोस आतां. चल आटप लवकर. भर जा तुझी बॅग. मला आणखी कांहीं जरूर पडली, तर चिठी लिहीन मी बाळूला. मी स्वत: त्याच्याशीं कुजबूज करण्यांत अर्थ नाहीं. संशय यायचा एखादे वेळीं तुझ्या आत्याबाईला.

**मैना** : हो, तें खरंच. जातें तर मी.

[मैना जाते.]

[ निशिकांत प्रवेश करतो. ]

**निशिकांत** : ओ हो, निळू! अरे, एवढ्या विचारांत कसल्या तूं?

**नीळकंठ** : माझा कसला नाहीं बुवा विचार. पण तूं अगदीं खुललेला दिसतोस?

**निशिकांत** : आपण आतां खूष आहोंत इथं राह्यला, बुवा. त्या म्हाताऱ्याची बडबड सहन करूनही राहण्यासारखं इथं आहे कांहीं तरी!

**नीळकंठ** : काय, झालं काय ?

**निशिकांत** : तुला काय वाटतं तूंच बायकांवर 'इंप्रेशन' मारूं शकतोस ? आम्हाला कांहींच जमायचं नाहीं असं तुला वाटतं ?

**नीळकंठ** : अरे पण, असं म्हणतो कोण ? तुम्हा लाजाळू लोकांना जमतं इतकं मोठमोठ्या धटिंगणांना जमत नाहीं ! पण अशी मारलीस तरी काय लढाई ?

**निशिकांत** : अरे लढाई म्हणजे काय ? जिंकलीच म्हणून समज !

**नीळकंठ** : कोण ?

**निशिकांत** : त्या बडबड्या म्हाताऱ्याची भाची—ती प्रभा. पाहिलीस नाहीं वाटतं तूं ? अशी छान पोरगी आहे ! नुसना कपड्यांचा भपका नाहीं त्या कुंदेसारखा महाराज ! अस्सल रत्न आहे !

**नीळकंठ** : पण तूं बोललास तरी कां तिच्याशीं ? कां नुसतं पाहूनच 'फिफ्टी परसेंट' ?

**निशिकांत** : ' फिफ्टी परसेंट ' नाहीं महाराज, अगदीं ' हंड्रेड परसेंट ' !

**नीळकंठ** : आनंद आहे. तें तुझं तूं पाहून घे. आतां आमची तुला जरूर नाहीं. पण मी दिलेला मैनेचा तो डबा नीट ठेवलास ना ?

**निशिकांत** : काय रे, पण एवढा पांच सहा हजारांचा ऐवज तूं बॅगेंत ठेवायला सांगतोस,—कांहीं तुला अक्कल आहे का ? बॅगच्या बॅग कुणी गडीनोकरांनीं उठवली तर ? मी त्या म्हाताऱ्याच्या पोक्त बायकोकडे तिच्या दागिन्यांच्या पेटींत जपून ठेवायला दिला तो. ती बाई तशी विश्वासू आहे !

**नीळकंठ** : काय, म्हणतोस काय, निशी तूं ?

**निशिकांत** : अरे म्हणणार काय ? तुझ्यासारखा धांदरट नाहीं मी !

**नीळकंठ** : खरंच तूं तो त्या म्हातारीजवळ दिलास !

**निशिकांत** : अरे, खरं म्हणजे ? मात्र तिच्या हातांत दिल्यावर ती चमकल्यासारखी झाली, नी संशयी दृष्टीनं डोळे फाडून माझ्याकडे पाहूं लागली !

**नीळकंठ** : मग ?

**निशिकांत** : मग काय ? मी सांगितलं, पाहतां काय ? संशय कसला येतो तुम्हाला ? आमच्याकडे दागिने असूं नयेत कीं काय ? तेव्हां ती हंसली, नी 'बरं बरं' म्हणून तिनं तो ठेवून घेतला.

**नीळकंठ** : नशीब माझं !

[ कपाळावर हात मारून तडक आंत जातो.]

**निशिकांत** : अरे,—अरे—झालं काय ? हा कोण, सुभान आला वाटतं !

[ सुभान घाईघाईनें प्रवेश करतो.]

**निशिकांत** : तुमच्या या हॉटेलांत ही गडबड नी धांवाधांव नेहमीं अशीच चालते काय रे ? एक क्षणभर देखील कुठं शांतता म्हणून नाहीं.

**सुभान** : हॉटेल ? हॉटेल कसलं साहेब ?

**निशिकांत** : हॉटेल नाहीं तर काय, तुमच्या महाराजांचा राजवाडा आहे हा !

**सुभान** : अहो साहेब, हा नानासाहेबांचा वाडा नव्ह का ?

**निशिकांत** : कोण नानासाहेब ?

[ कुंदा प्रवेश करते. ]

**कुंदा** : अरे सुभान, बोलत काय राह्यलायस्. तुला आंत तिकडे हांक मारताहेत ना ?

**सुभान** : हा चाललोंच नव्ह का !—पण हे साहेब काय म्हण-तात बघा—हें हॉटेल आहे काय विचारतात.

**कुंदा** : जा जा तूं आंत. तुझी बडबड पुरे !

[ सुभान जातो. ]

**निशिकांत** : हा म्हणतोय काय ? कुठल्या नानासाहेबांचा वाडा ? तुझ्या मामाला नानासाहेब म्हणतात कीं काय ?

**कुंदा** : मी तुमची क्षमा मागतें. मी मघाशीं फसवलं तुम्हाला थोडसं.

**निशिकांत** : म्हणजे ?

**कुंदा** : हें मुळींच हॉटेल नाहीं. हा नानासाहेब सरंजाम्यांचा वाडा !

**निशिकांत** : काय ? हा नानासाहेब सरंजाम्यांचा वाडा !—हें हॉटेल नाहीं ?

**कुंदा** : नाहीं—तुमच्या नीळकंठरावांना हें केव्हांच कळलं आहे. पण त्यांनीं आणि मैनाबाईनीं तुमची थट्टा करायचं ठरवलं आणि मला पण तुम्हाला फसवायला सांगितलं ! मला क्षमा करा म्हणतें.

**निशिकांत** : मग तूं सुद्धां अर्थात् त्यांची भाची नाहींस ? तूं कोण ? तूं—?

**कुंदा** : मी प्रभाच—नानासाहेबांची भाची. माझे आईबाप अगदीं गरीब आहेत, म्हणून कुंदेच्या सोबतीला मला नानासाहेबांनीं इथं ठेवून घेतलंय.

**निशिकांत** : हें खरं तर सगळं ?

**कुंदा** : अगदीं खरं !

**निशिकांत** : काय करूं मी ? मला आत्तांच्या आतां तोंड घेऊन इथून गेलं पाहिजे. मला आतां इथं कुणाला तोंड दाखवायला जागा आहे का ? ( दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेतो. )

**कुंदा** : ( रडण्याचें सोंग करून ) तुम्हाला फसवण्यांत मीही सामील झालें त्याचं मला वाईट वाटतं ! किती मेली दुष्ट मी !

**निशिकांत** : प्रभा, प्रभा,–तूं रडतेस कशाला? तूं काय करणार? तुझा काय अपराध यांत ?—तूं मात्र मला विसरूं नकोस.

**कुंदा** : मी कशी विसरेन तुम्हाला ?

**निशिकांत** : जातों मी. [ जातो. ]

**कुंदा** : बिच्चारे !

पद

**मीच किती शठ जीव खुला हा, प्रीतिवनांतिल खेळ असा**
**क्षणभर फसवी, क्षणभर हंसवी, हांसत, खेळत प्रेम जिवा**

[ हंसत आंत जाते. ]

---

## प्रवेश तिसरा

नानासाहेबांचा दिवाणखाना

बाळू आणि मैना

**बाळू** : तुझ्या त्या बावळट निळोबानं शेवटीं घोटाळा केला ना ? आतां बसा कोकलत ! एकदां चोरी केली डब्याची तुमच्यासाठीं मी. तो डबा आपला पुन्हां आईच्या पेटींत !

**मैना** : पण आत्याबाई काय म्हणत असतील, बाळासाहेब ?

**बाळू** : आत्याबाई काय म्हणणार ?—मीं घेतलं सांवरून मोठ्या

प्रयासानं. तुझी थट्टा करण्याकरितां तुझी किल्ली घेऊन मीच तो काढला होता; आणि मीच निशिकांतजवळ देऊन तुझ्याकडे ठेवायला दे म्हणून सांगितलं, अशी थाप मारली मी आईला. जांवईबापूंचाच तूं चोर म्हणून संशय घ्यावास म्हणून मुद्दामच निशिकांतला तुला तो द्यायला सांगितलं, अशीही एक लोणकढी दिली !

**मैना** : पण निशिकांतबद्दल आत्याबाईंना—

**बाळू** : अग, त्यालाही माझ्या थट्टेंत सामील करून घेतला होता म्हणून सांगितलंच होतं मी !

**मैना** : कमाल आहे तुमची, बाळासाहेब ! मात्र आत्याबाईंना माझ्या या भानगडीचा यत्किंचितही जरी संशय आला, तर खेड्या-वरल्या बंगल्यांत नेऊन सक्त पहाऱ्यांत ठेवतील त्या मला ! आत्याबाई पत्करल्या, पण तिथल्या बापूकाकांची कैद नको बाई ! बापूकाका म्हणजे जमदग्नीचेच अवतार ते ! त्यांच्या कानावर आत्याबाईंनीं ही गोष्ट घातली, कीं बंगल्याच्या बाहेर बागेंतसुद्धां मला पाऊल टाकायला द्यायचे नाहींत !

**बाळू** : तुमच्याच बावळटपणाचे परिणाम हे !—ही आलीच आई.

[पार्वतीबाई प्रवेश करतात.]

**पार्वती** : बाळू, थट्टेला तरी कांहीं सीमा असावी ! आणि आमचे जांवईबापूही तुला बरे साथीदार मिळाले. त्यांनींही सोंग किती हुबेहूब आणलं होतं ! म्हणे माझ्या मित्राचे दागिने ! मी भलतंच कांहीं तरी बोलून गेलें असतें तर ?

**बाळू** : तूं कसची बोलतेस जांवयाला ग !

**पार्वती** : बरं म्हणून बरं ! थट्टेला तरी कांहीं सुमार तुझ्या, बाळू ? आणि पुन्हां दुसऱ्याचे दागिने—मैनेचे ते.

[ सुभान प्रवेश करतो. ]

**सुभान** : त्या पाहुण्यांनीं तुम्हाला ही चिठ्ठी दिली आहे, बाळासाहेब.

**बाळू** : मला चिठ्ठी ?—कसली पाहूं. [ सुभान चिटी देऊन जातो. ] हें काय अक्षर आहे कीं कोंबड्याचे पाय ! आणि किती घाईंत खरडलेली आहे ही !—छे: ! आपल्याला कांहीं लागत नाहीं बुवा—आई, नाहीं तरी माझीं पत्रं तूं चोरून वाचतेसच. ही चिठ्ठी तेवढी वाचून दाखव मला.

**पार्वती** : मला सर्व अक्षर लागतं. मी मोडी शिकलेंय--तुमच्यासारखी नाहीं. ( चिठ्ठी घेऊन वाचते. )

बाळासाहेब,

डबा तर हातचा गेलाच. आतां मैना नी मी दहांच्या गाडीनें पळून जाऊं म्हणतों. तेव्हां तेवढी टांग्याची चोख व्यवस्था करा. एवढी शेवटची मदत करा.

आपला,

**नीळकंठ**

बाळ्या,—मैने ! हें काय ग ! कारस्थानी पोरं !—त्याच्याबरोबर पळून जायचा तुझा बेत चालला होता होय ? हं अस्सं ?—तरीच तूं संध्याकाळपासून दागिन्यांचा ध्यास घेऊन बसली आहेस !—आणि बाळू !—तूं यांच्या कारस्थानांत सामील ?

**बाळू** : अग आई, सामील कसला ? मी यांचं सगळं कारस्थान ऐकून घेतलं. टांगा हांकणार होतों मीच. डबा देणार होतों यांच्या हातांत. टांग्यांत बसवणार होतों दोघांना. आणि सर्व जय्यत तयारी झाल्यावर आंत येऊन तुला सांगणार होतों; आणि डबा, ही आणि

हिचा तो नीळकंठ या सर्व मुद्देमालासह चोर तुझ्या हातांत देणार होतों ! यांना कुठं माहीत होतं माझं कारस्थान !

**पार्वती** : माझा नाहीं विश्वास तुझ्यावर !

**बाळू** : आतां काय सांगूं आई तुला ? तूं आल्यावर त्या निळ्याला बाहेर हांकलून तुझ्या पुढ्यांत त्याच टांग्यांतून हिला खेड्यावर नेऊन बापूकाकांच्या तावडींत देण्याचा माझा विचार होता. मग बापूकाका जेलर आणि ही कैदी ! बसली असती तुझ्या नी माझ्या नांवानं खडे फोडीत !

**पार्वती** : नाहीं तरी तिला आतां कुठं सोडतें आहे मी. आतां एक क्षणभर ती या घरांत रहात नाहीं. आतां हिला नेतें खेड्यावरच्या बंगल्यांत. टांगा तयार करायला सांग आत्तांच्या आत्तां.

**बाळू** : त्याची काळजी नको, आई. खेडं–खेडं म्हणजे काय ?— सात-आठ मैल तर आहे—तासांत येतों परत हिला सोडून.

**पार्वती** : मीही येतें स्वतः. माझ्या डोळ्यांदेखत बापूभावोजींच्या ताब्यांत हिला दिल्याशिवाय मला नाहीं चैन पडायचं.

**बाळू** : आई, तूं कशाला त्रास घेतेस ?

**पार्वती** : छे छे, माझा आतां कुण्णावर विश्वास नाहीं. चल ग, कपडे कर !

**बाळू** : ठीक आहे. तुला यायचं तर ये.

[पार्वतीबाई मैनेला घेऊन आंत जाते.]

[ नीळकंठ प्रवेश करतो. ]

**नीळकंठ** : बाळासाहेब, काय घोटाळा आहे हा ? आत्याबाईंची आरडाओरड काय चालली आहे ?

**बाळू** : अहो घोटाळा कसला ? तुम्ही ब्रह्मघोटाळा केलात !—

तो डबा दिला, तो निशिकांतच्या हातीं देऊन पुन्हां आईच्या पेटींत घालवलात !—आतां ती चिठ्ठी पाठवलीत ती आईच्याच हातांत पडली ! मैनेला आत्तांच्या आत्तां टांग्यांत घालून खेड्यावर बापूकाकांच्या हवालीं करायला आई निघाली आहे !

**नीळकंठ** : म्हणजे संपलाच म्हणायचा सगळा कारभार !

**बाळू** : कांहीं संपला नाहीं ! आतां कारभाराला खरी सुरुवात होणार ! डब्याच्या बाबतींत तुमची चूक झाली. चिठ्ठीच्या बाबतींत माझी चूक झाली आहे. ती मी बरोबर सुधारून घेतों. तुम्हाला कांहीं काळजी नको.

**नीळकंठ** : म्हणजे तुम्ही करणार काय ?

**बाळू** : अहो, टांगा हांकणारा मीच आहें ना ?—मग झालं तर.

**नीळकंठ** : म्हणजे ?

**बाळू** : म्हणजे कांहीं नाहीं.—आमच्या वाड्याच्या मागं बाग आहे ना ?—बाग कसली ? जंगलच तें.—आमच्या इथल्या बागा म्हणजे तुमच्या बागांसारख्या टीचभर नव्हेत.—वाड्याच्या मागं चांगली फर्लांग-भर पसरली आहे ती.—राईच आहे म्हणा ना.—तिथं मागल्या बाजू-ला एक फाटक आहे. त्या फाटकाजवळ बॅग वगैरे सर्व कांहीं घेऊन तयार रहा. तास दीड तासाच्या आंत मी तिथं येतों. तुमचा डबा आणि मैना तुमच्या हातांत मिळेल तिथं. आपला माल हातांत पडल्या-बरोबर सरळ स्टेशनचा रस्ता धरा नी दहांची गाडी पकडा.

**नीळकंठ** : म्हणजे ! तुम्ही—

**बाळू** : आतां विचार करीत राहूं नका. मी सांगतों तसं गुपचूप करा. पुन्हां घोंटाळा केलात तर मी निस्तरणार नाहीं चला.

[ दोघेही जातात. ]

**पडदा**

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

वाड्याच्या म.गल्या बाजूचा कोंपरा.

[नीळकंठ वाट पहात उभा आहे. टांग्याचा आवाज होतो. बाळू हातांत चाबूक घेऊन प्रवेश करतो.]

**बाळू** : हा घ्या डबा. तुमची मैना ती पहा बागेच्या पलीकडे वाट पहात उभी आहे. आतां सरळ स्टेशनचा रस्ता पकडा. या राईतून पलीकडे गेलांत, कीं सरळ जातो तो रस्ता स्टेशनचा.

**नीळकंठ** : अहो पण बाळासाहेब, हा आहे काय चमत्कार! हा डबा तुमच्या हातांत परत कसा आला? मैना इथंच कशी? नी आई-साहेब कुठं आहेत?

**बाळू** : असले चमत्कार म्हणजे बाळूच्या हातचा मळ आहे! अहो, डबा कितीही वेळां आईच्या पेटींत परत गेला, तरी बाळूच्या हातीं परत येणारच. आईच्या पेटीची डबल किल्लीच आहे मुळीं माझ्याकडे!—आमची भैरवाश्रमांत वाटेल तशी चैन चालते ती काय उगाच?—लागतील तेव्हां मी पैसे उभे करूं शकतों!

**नीळकंठ** : पण तुम्ही सर्व खेडयावर गेलां होतांत ना टांग्यांतून?

**बाळू** : पण टांगा हांकणारा मी होतों हें तुम्हाला किती वेळां सांगितलं ?

**नीळकंठ** : म्हणजे, आईसाहेब तुमच्याबरोबर आल्या नाहींत वाटतं ?

**बाळू** : आईसाहेब, मैनासाहेब, बाळासाहेब सर्व कांहीं ठरल्याप्रमाणं मंडळी निघाली! आईसाहेब पलीकडे टांग्यांत बसल्या आहेत थरथरत!

**नीळकंठ** : मग तुम्ही सर्व आपल्याच वाड्याच्या बागेजवळ इथं कसे ?

**बाळू** : अहो, टांगा जर आपल्याच वाड्याच्या भोंवतीं गरगरां गरगरां एक तास फिरवीत राह्यलं तर आम्ही दुसरीकडे जाणार कुठं ?

**नीळकंठ** : म्हणजे तुम्ही केलंत तरी काय? माझ्या कांहींच लक्षांत येत नाहीं.

**बाळू** : अहो, तुम्हाला ही आमची बाग वाटते आहे. पण आईला वाटतंय आपण खेड्याजवळच्या कुठल्या तरी रानांत अडकून पडलों आहोंत म्हणून! बाहेर काळोख किती मिट्ट पडलाय पहातां ना तुम्ही! मीं जो टांगा बाहेर काढला तो ऐसा पिटाळीत सुटलों घोड्यांना, कीं आईला श्वास घ्यायला फुरसद दिली नाहीं! या राईच्या पलीकडे ती टेकडी आहे ना?—त्या टेकडीवरून खांचाखळग्यांतून, चिखलांतून, या राईच्या आजूबाजूच्या झाडांतून–या वाड्याभोंवतालच्याच टापूंत असा बेफाम टांगा हांकलीत राह्यलों, कीं आपण किती मैल नी कुठं आलों याचा आईला पत्ता नाहीं!—तिच्या तोंडांतून शब्द उमटत नाहीं.

**नीळकंठ** : खरं कीं काय ?

**बाळू** : खरं म्हणजे ?—आणि आतां टांग्याचं चाक जरा सरकलं आहे, असं सांगून खालीं उतरलों, आणि मैनेला मदतीला बोलावली—काळोखांत रस्ता चुकून खेड्याजवळच्या भलत्याच रानांत येऊन आपण पडलों आहोंत म्हणून आईला थाप दिली. तिला टांग्यांतच बसवून ठेवली आहे, आणि मी नी मैना रस्ता नीट पाहून येतों म्हणून सांगून इथं आलों !—आमच्या खेड्याजवळच्या रानांत चोराचिलटांचा नी दरोडे-खोरांचा फार उपद्रव आहे हें माहीत असल्यामुळं आई भयंकर घाब-रून गेली आहे !

**नीळकंठ** : तुमच्यापुढं साष्टांग नमस्कार, बाळासाहेब !

**बाळू** : आतां नमस्कार चमत्कार करण्यांत वेळ घालवूं नका !—ती पहा मैना याच बाजूला येते आहे—पकडा तिला नी स्टेशनकडे पळा बघूं !—आईसाहेबांची मी सोय लावतों !

**नीळकंठ** : बाळासाहेब, तुम्ही लाख माणूस आहांत !

**बाळू** : जा, जा. आतां !—

[ नीळकंठ जातो. ]

**बाळू** : आई—ए आई—

**पार्वती** : ( पडद्यांतून ) बाळू, तूं बोलतोयस् कुणाशीं ? आवाज कुणाचा येतोय ?

**बाळू** : अग, घाबरूं नकोस—उतर तूं खालीं—मी येऊं का तुला खालीं उतरून घ्यायला ?—

[ आंत जातो व तिला घेऊन येतो. ]

**पार्वती** : तुझ्याबरोबर बोलत होता तो कोण ?—माझी दांतखिळी बसण्याची वेळ आली आहे, बाळू !

**बाळू** : अग, तो एक वाट चुकलेला आमच्यासारखाच प्रवासी होता. चोर नव्हता कांहीं ! त्याला मी विचारीत होतों वाट, नी तो मला विचारीत होता !

**पार्वती** : एवढंच ना ? मला वाटलं आला कुणी दरोडेखोर !

**बाळू** : दरोडेखोर नाहीं कुणी—पण तो प्रवासी एवढं मात्र म्हणाला, कीं काळा बुरखा घेतलेला कुणी तरी एक उंच माणूस हातांत कंदील घेऊन लांब लांब टांगा टाकीत याच बाजूनं येतो आहे—कोण आहे देव जाणे !

**पार्वती** : दरोडेखोरच असणार ! दुसरा कोण ?—त्याला म्हणावं माझ्या या बांगड्या, कुड्या सर्व घे, पण जिवानिशीं सोड आम्हाला !

**बाळू** : त्याचा कंदील दिसायला लागला—जवळ जवळ येतोय—– आई, तूं त्या झुडपाच्या मागं लप.—मी त्याला पाहून घेतों.

[ ती लपते. नानासाहेब कंदील घेऊन येतात. ]

**नाना** : कोणरे तो ?—बाळू !—तूं इथं काय करतोयस् ?

**बाळू** : कांहीं नाहीं, नाना ?

**नाना** : हातांत चाबूक आहे तुझ्या, टांगा तिथं उभा आहे,—आई कुठं आहे तुझी ? घरांत कशी नाहीं आली अजून ?

**बाळू** : आई खेडयावरच राह्यली, नाना !

**नाना** : खोटं बोलतोस ! खेड्यावर कशी राहील ? घरीं पाहुणे यायचे आहेत आणि—

**बाळू** : रहातें म्हणाली खरी, बुवा !

**नाना** : बाळ्या, कांहीं तरी पाणी मुरतं आहे इथं !—तूं कांहीं तरी नवीन उचापत केली आहेस.—पाहतोंच जाऊन टांग्यांत काय आहे तें !

**बाळू** : नाना, कांहीं नाहीं तिथं. उगाच जाऊं नका त्या बाजूला—एक नागीण बिळांत शिरतांना पाहिली मी तिथं—तिला मारायला पहात होतों!

**नाना** : गाढवा, चाबकानं नागिणीला मारीत होतास?—लुच्चा कुठला! पहातोंच मी काय भानगड आहे ती!

[झुडुपाकडे जातात. पार्वतीबाई कांपत पुढें येऊन त्यांचे पाय धरतात.]

**पार्वती** : या बांगड्या घे, या कुड्या घे, ही मोहनमाळसुद्धां घे. तेवढं मंगळसूत्र राहूं द्या—पण मारूं नकोस आम्हाला!

**नाना** : कोण? तूं?—अग झालं काय तुला?—आपल्याच बागेंत लपून कशाला बसली आहेस?

**पार्वती** : अग बाई, तुम्ही?—तुम्ही या रानांत कसे? मला वाटलं दरोडेखोर!

**नाना** : कसलं रान, नी कसला दरोडेखोर?—तुझं काय मस्तक फिरलंय कीं काय? स्वत:चं घर तुला ओळखतां येत नाहीं? अग हा आपला बाग—तो पहा आपला वाडा!

**पार्वती** : म्हणजे झालं काय?—मी झोंपेंत तर नाहीं ना?

**नाना** : (तिला चिमटा काढून) ही बघ, चांगली जागी आहेस!—बाळ्या!—तुझं कांहीं तरी कारस्थान आहे हें! ही इथं कशी?

**बाळू** : त्यांत काय नवल, नाना! पृथ्वी गोल आहे तसा आपल्या वाड्याभोंवतालचा प्रदेश गोलच नाहीं का? वाड्याभोंवतींच एक तासभर टांगा फिरवीत राह्यलं तर पुन्हां आम्ही वाड्यांतच नाहीं का येणार?

**पार्वती** : बाळू—बाळ्या,—काय, म्हणतोयस् काय तूं? माझा असा घात केलास?—पण मैना कुठं आहे?

**बाळू** : मैना, तिचा नीळकंठ आणि तिचा दागिन्यांचा डबा आतां आगगाडीच्या डब्यांत असतील !

**पार्वती** : अग आई ग !

---

## प्रवेश दुसरा

वाड्याचा एक भाग.

नानासाहेब आणि दिवाणबहादूर रत्नपारखी.

**दि. ब.** : हा: हा: हा: हा:; म्हणजे तुम्हाला तो खाणावळवाला समजतो आहे, नानासाहेब ?

**नाना** : अहो नुसता समजतो आहे नव्हे; तर तुमचे युवराज हुकुमावर हुकूम सोडताहेत माझ्यावर !

**दि. ब.** : इतका उर्मटपणा करणार नाहीं आमचा निशी. परक्या-समोर तर भारीच लाजतो तो–!

**नाना** : आतां त्याच्या लाजेचं पुराण मला तरी सांगूं नका, दिवाण बहादूर ! माझा कान धरून वांकवायचं त्यानं शिल्लक ठेवलंय ! बाकी त्याचा अपराध नाहीं म्हणा !–खाणावळवाल्यापुढं लाजायचं नी नम्रपणानं वागायचं त्याला कांहींच कारण नाहीं.—मला तो खाणा-वळवाला समजतोय हें कुंदेनं मघां मला सांगितलं.

**दि. ब.** : म्हणजे तुमची कुंदाही त्याला फसवण्याच्या कटांत सामील आहे तर ?

**नाना** : पोरांनीं जरा गंमत केली आहे झालं !—त्याला ती फार आवडली आहे.--त्यानं स्वतः होऊन तिच्याजवळ लग्नाची गोष्ट काढली म्हणे !

**दि. ब.** : तें नाहीं शक्य वाटत मला. इतका धीट–किंवा फाजील म्हणा—आमचा निशी बायकांच्या समोर ? शक्यच नाहीं !

**नाना** : तोच येतोय. त्यालाच विचारून काय तो निकाल लावूं या.

[ निशिकांत प्रवेश करतो. ]

**निशिकांत** : बाबा, तुमच्यासमोर मी यांची पुनः एकदां क्षमा मागतों. माझी भयंकर चूक झाली !

**नाना** : क्षमा कसली, निशिकांत ?—भलतंच काय ? तुम्ही काय करणार त्याला ? तें विसराच आतां--त्यांत कांहीं नाहीं—बाकी तुम्ही स्वतः होऊन कुंदेजवळ लग्नाची गोष्ट काढलीत हें छान केलंत. मला आणि दिवाणबहादुरांना--आम्हाला दोघांनाही आनंद आहे त्यांत.

**निशिकांत** : कुंदेजवळ लग्नाची गोष्ट ?–मी कधींच काढली नाहीं. आल्यावर फक्त पांच सहा मिमिटं तिचं माझं बोलणं झालं.-त्यांत काव्य आणि जीवनाची रुक्ष चर्चा आम्ही केली.–मी तिच्याकडे वर मान करूनसुद्धां पाहलं नाहीं–लग्नाचा तर विचारसुद्धां आला नाहीं माझ्या मनांत तिच्यापुढं !

**नाना** : आम्ही सर्व पाह्यलं, निशिकांत. आतां लाजतां कशाला ? आमचं कांहीं म्हणणं नाहीं–म्हटलं ना आम्हाला आनंदच आहे त्यांत. मीं प्रत्यक्ष पाह्यलं तिचं डोकं तुम्ही आपल्या खांद्यावर घेतांना, तेव्हां

राग आला, पण आतां कांहीं नाहीं त्याचं.—तरुणपणीं हें चालायचंच!— अहो, आम्हीही सुधारक आहोंत. एकदां लग्न करा म्हणजे झालं!

**दि. ब.** : निशी, तूं इतकी मजल गांठलीस, अं? मला वाटलं नव्हतं—

**निशिकांत** : हे काय म्हणतात तेंच मला कळत नाहीं. मी म्हणतों तें अक्षरशः खरं आहे.—काव्य आणि जीवनाची आम्हीं चर्चा केली—पुन्हां तिची आणि माझी गांठसुद्धां पडली नाहीं. कुणाचा खांदा?—नी कुणाचं डोकं?

**नाना** : निशिकांत, आतां पुरे झाली तुमची लाज!—दिवाणबहादूर कांहीं रागवावयाचे नाहींत—झालं तें ठीक झालं! माझंच जर त्याविरुद्ध कांहीं म्हणणं नाहीं, तर दिवाणबहादूर तरी काय करणार?

**निशिकांत** : अहो, पण—

**दि. ब.** : त्यांनीं स्वतःच्या दोन डोळ्यांनीं पाह्यलं.—तुझी गचांडी धरून ते हांकलून सुद्धां देणार होते—आणि तूं 'पण—पण' काय करतो आहेस?

**निशिकांत** : बाबा, मी तुम्हाला शपथेवर सांगतों, मी कुंदाला—

**दि. ब.** : कशाला हव्यात शपथा? कोण पाळतो या दिवसांत शपथा?—आमच्या स्वतःच्या पोरांचा स्वभाव तरी आम्हाला कुठं पुरा माहीत असतो?—बरं झालं—झालं तें.—कशाला शपथा घेतोस?—मला आनंदच आहे तूं इतका धीट झालास त्याचा!

**निशिकांत** : नशीब माझं!—मी माझी बॅग भरतों, नी चालायला लागतों मुंबईला!

[जातो.]

**नाना** : अहो, अहो,—निशिकांत, उगाच डोक्यांत राख कशाला घालतां?

**दि. ब.** : त्याच्या बोलण्यावरून नी चेहेऱ्यावरून तो खरं बोलतोय असं दिसतं.–पण तुम्ही म्हणतां–मग काय घोंटाळा आहे कुणास ठाऊक !

**नाना** : माझीही कांहीं मती चालत नाहीं बुवा.—ही कुंदाच आली.–तीच सांगेल खरं काय तें !

[ कुंदा प्रवेश करते. ]

**नाना** : कुंदा, ये अशी. हे दिवाणबहादूर. लाजायचं कांहीं कारण नाहीं. निशिकांतचं आणि तुझं काय काय बोलणं झालं तें सगळं कांहीं आम्हाला सांग.

**दि. ब.** : त्यानं तुझ्याशीं लग्न करण्याची इच्छा दर्शविली ?

**कुंदा** : हो.

**दि. ब.** : तो म्हणतो, काव्य आणि जीवनाखेरीज आपण कांहींच बोललों नाहीं तुझ्याशीं !

**कुंदा** : तें पहिल्यांदा.–पण पुन्हां भेटले तेव्हां किती तरी मोकळे-पणानं माझ्याशीं बोलले ते–लग्न करतों म्हणाले, इतकंच नव्हे, तर माझी उंची किती आहे हें पाहायला मला जवळ ओढून, मी ‘ नको नको’ म्हणत असतांना माझं डोकंसुद्धां आपल्या खांद्याला टेकलं त्यांनीं !

**नाना** : घ्या, दिवाणबहादूर !

**दिं. ब.** : आश्चर्य आहे बुवा ! आमचा निशी असं करील, असं अजूनसुद्धां मला वाटत नाहीं.

**कुंदा** : मी तुमची पुन्हां खात्री करून देतें हवी तर.–माझ्याशीं ते किती मोकळेपणानं बोलतात तें पहा. मात्र तुम्ही आडोशाला राहायलं पाहिजे. तुमच्या पुढ्यांत कदाचित् मोकळे होणार नाहींत ते.

दि. ब. : ठीक आहे. तूं सांगशील तिथं आम्ही उभे रहातों. निशिकांतचं हें स्वरूप मी डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय माझा विश्वास बसायचा नाहीं.

कुंदा : चला तर.

– पद –

फसवुं का गुरुजना करुनि बलि सखा,
धरि मी बालिका, करिन नाटिका
हंसुनि, रडुनि, लाजुनी, रुसुनि फुगुनि बोलुनी
हृदयदान प्रियकरा, करिन मी न का ?

---

## प्रवेश तिसरा

वाड्यांतला दिवाणखाना.

दिवाणबहाद्दूर, नानासाहिब आणि कुंदा.

कुंदा : ते बॅग वगैरे भरून जायची तयारी करताहेत. शेवटची भेट घ्यायला म्हणून मी इथं बोलावलंय त्यांना !

दि. ब. : मग आम्ही काय करायचं !

कुंदा : तें सांगतें मी. तुम्ही त्या पडद्याच्या मागं दोघेही उभे रहा. उगीच मधें बोलायचं नाहीं. मी काय करतें तें पहा.

नाना : अग पण—

**कुंदा** : नाना, आतां बोलायचं नाहीं, तुम्ही कबूल केलंय ना ?—चला बघूं लवकर,—ते आलेच !

[ नानासाहेब व दिवाणबहादूर पडद्यामागें जाऊन उभे रहातात. ]

[निशिकांत प्रवेश करतो.]

**निशिकांत** : जातों मी. आमच्या बाबांना भलताच संशय आलाय.

**कुंदा** : म्हणून इतक्या घाईनं जायला कशाला पाहिजे ? आतां आलांत ते रहा दोन दिवस.

**निशिकांत** : आतां या घरांत दोन दिवस ? दोन मिनिटं रहायला मी तयार नाहीं.

**कुंदा** : पण—माझ्यासाठींसुद्धां तुम्ही रहाणार नाहीं ना ?

**निशिकांत** : तुझ्यासाठीं दोन वर्षंसुद्धां राह्यलों असतों. पण—पण--खरंच—( पडद्यामागें डोकें वर करून दिवाणबहादूर व नानासाहेब एकमेकाकडे पहातात. ) तोच तर घोटाळा झाला आहे.

**कुंदा** : घोटाळा कसला ?—मी तुम्हाला आवडत का नाहीं ?

**निशिकांत** : तूं आवडत नाहींस ?—तूं आवडलीस इतकी आतांपर्यंत कुणीच आवडली नाहीं मला !

(पडद्यामागें डोकें वर करून नानासाहेब व दिवाणबहादूर एकमेकांकडे पहातात.)

**कुंदा** : पण, मला सोडून जातांना मात्र तुम्हाला कांहीं वाटत नाहीं !

**निशिकांत** : कांहीं वाटत नाहीं कसं ?—पुष्कळ वाटतं—पण—

**कुंदा** : पण काय ?—माझं कूळ हलकं वाटतं कीं काय तुम्हाला ?

**निशिकांत** : छे, छे. तुझ्यासारख्या गुणी नी सुंदर मुलीच्या कुळाची कोण पर्वा करतो ! पण आतां इथं राहणं मला शक्य नाहीं--तूं मुंबईला पळून ये.--मग तिथं आपण चोरून--

**कुंदा** : अग बाई !--चोरून काय ?

**निशिकांत** : घाबरतेस काय ?--चोरून लग्न करूं !

[पडद्यामागून नानासाहेबांना घेऊन दिवाणबहाद्दूर बाहेर येतात.]

**दि. ब.** : बस्. बस्. निशी ! तूं कुंदेशीं लग्न करायची गोष्ट-सुद्धां बोलला नव्हतास नाहीं का ?—मला फसवतोस ? नानासाहे-बांना खोटं पाडीत होतास ? इतकीं वर्षं आणलेलं तुझं लाजाळूपणाचं सोंग होतं तर ?

**निशिकांत** : बाबा, खरंच मी कुंदेशीं पुन्हां बोललों देखील——

**दि. ब.** : चूप रहा. बस झालं आतां नाटक तुझं !

**नाना** : पाह्यलंत दिवाणबहाद्दूर ? आतां तुम्ही डोळ्यांनींच पाह्य-लंत ना ? अहो निशिकांत, त्यांत एवढी लाज कसली वाटते तुम्हाला ? ही कुंदा आणि हे तुम्ही ! आत्तां लग्न लावून देतों हवा तर. मुंबईला जाऊन चोरून मारून भानगडी कशाला करायला हव्यात ?

**निशिकांत** : पण ही–

**दि. ब.** : 'रोमान्स' हवा ना ? या अलिकडच्या मुलांचीं डोकीं फिरलीं आहेत ! सरळ आईबाप लग्न लावून देतायत तर तिला मुंबईला यायला सांगतो, नी चोरून तिथं लग्न करूं या म्हणे !

**निशिकांत** : पण ही प्रभा–ही कुंदा नव्हे.

**कुंदा** : मी नाहीं प्रभा–मी कुंदाच ! नाकावरून नागपूर मेल गेलेली–तिरळ्या डोळ्यांची !

**नाना आणि दि. ब.** : ही प्रभा कोण ?

**कुंदा** : मीच नाना.—आतां खरं सांगतें. त्यांना रागावूं नका उगीच. मी कुंदा–नव्हे प्रभा नांवाची तुमची एक गरीब भाची आहे म्हणून मीच त्यांना फसवलं !

**निशिकांत** : म्हणजे ?—

**कुंदा** : मी पदर पसरून क्षमा मागतें तुमची. मघांशीं मी तुमचा अर्धा भ्रम दूर केला; अर्धा तसाच ठेवला.

**नाना** : अग, पण या भानगडी तुम्ही करतां कां सगळे ?

**कुंदा** : यांना गरीब मुली आवडतात; आणि कुंदा म्हणजे कुणी-तरी भलतीच हुषार नी जहांबाज मुलगी आहे अशी यांची कल्पना आहे, असं मैनेनं मला सांगितलं, म्हणून गरीबीचं सोंग आणून यांचा लाजाळूपणा घालवायचं मी ठरवलं होतं.

**नाना** : दिवाणबहादूर, निशिकांतांनीं तरी काय करायचं या एका-पेक्षां एक लबाड पोरींच्यापुढं ?

**दि. ब.** : मी सांगितलं नाहीं ?—माझा निशिकांत तसा उगाच खोटं बोलायचा नाहीं !

**नाना** : तें सर्व राहूं द्या.--निशिकांत, आतां कुंदेशीं तुम्हाला लग्न करायला कांहीं हरकत नाहीं.

**निशिकांत** : मी कुंदेशीं मुळींच लग्न करणार नाहीं,-प्रभेशींच करणार !

**दि. ब.** : ठीक आहे;—लग्न झाल्यावर तिचं नांव प्रभा ठेवूं. म्हणजे नवरी कुंदा असली तरी तुझी बायको प्रभाच ! काय, नाना-साहेब ?

**नाना** : आपणाला हा सुवर्णमध्य एकदम पसंत आहे !

**दि. ब.** : अरे, पण तुझ्याबरोबर आलेला नीळकंठ कुठं आहे ?

[ पार्वतीबाई आणि बाळू प्रवेश करतात. ]

**पार्वती** : तो दरोडेखोर पळाला माझी मैना नी दागिने घेऊन !

**बाळू** : त्याची मैना नी तिचे दागिने म्हण आई !

**दि. ब.** : कोण दरोडेखोर ? आमचा नीळकंठ ?--त्याच्यासारखा मुलगा तुम्हाला शोधून मिळायचा नाहीं. त्याला तुमच्या मैनेशीं लग्न करायचं आहे हें मला माहीत होतं. मीच काढणार होतों त्याच्या लग्नाची गोष्ट नानासाहेबांकडे !

**नाना** : तरी मी हिला म्हणत होतों नेहमीं, कीं त्या मैनेवर बाळूशींच लग्न कर असा तुझा जुलूम कां ? बाळू तर तिला पाण्यांत पहात असे.--हें पहा दिवाणबहादूर, आम्हीही तसे सुधारक आहोंत. पोरांच्यावर भलताच जुलूम आम्ही नाहीं करणार !

**पार्वती** : पण म्हणून पोरीला पळवून का न्यायची ?

**नाना** : पळवीना का ?--लग्न करणार आहे ना ?--आम्हीही तसे सुधारक आहोंत !--काय दिवाणबहादूर ?

**दि. ब.** : आज तर तुम्ही भलतेच सुधारक झालेले दिसतां, नानासाहेब !

**नाना** : आम्ही मनांतून पहिल्यापासून सुधारक आहोंत.--मुलींचीं लग्नं व्हावींत हीच आमची इच्छा ! निशिकांत, आमच्या या कुंदेचा आमच्या डोळ्यांदेखत हात हातांत घ्या. घ्या, लाजूं नका.

**बाळू** : कांहीं लाजूं नका, निशिकांत ! आमचे नाना भयंकर सुधारक आहेत !

( कुंदेचा हात नानासाहेब निशिकांतच्या हातांत देतात. )

**पडदा**

**समाप्त.**

# नको नको हा संसार !



हा संसार, ही संपत्ति, हें वैभव,

पट्टराणीचा लाडिकपणा,



१६०० राण्यांचा मोहपाश,

मातेची माया

**कांहीं कांहीं नको !**

*

या सर्वांवर लाथ मारून बैरा-
ग्याची दीक्षा घेणाऱ्या राजा
गोपीचंदाची हृदयंगम कथा.

**सरस्वती सिनेटोनचा**
**हृदयंगम मराठी बोलपट**

# राजा गोपीचंद

**संचालक** — **दादासाहेब तोरणे**

**दिग्दर्शक** — **भाल. जी. पेंढारकर.**

भूमिका

**लीली, रत्नप्रभी, उषी, चंद्रकांत, लोंढे, दिनकर ढेरे**

## रॉयल ऑपेरा हाऊस

**मध्यें सुरू आहे**

प्रकाशक—कपूरचंद लि. मुंबई नं. ४.